


नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १८ वे ] ऑगस्ट १९६५ [ अंक ११



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.






प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष अठरावे | अंक अकरावा

# नवभारत

ऑगस्ट १९६५

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. वेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. वेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा-मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमराववाडी, मुंबई २
फोन नं. २३५५४

अनुक्रमणिका








श्री. वसंत दीनानाथ राव

# श्रीशिवराज राज्याभिषेक कल्पतरु

महाराष्ट्रात मराठ्यांचे किंबहुना हिंदुपदपातशाहीचे थोर आदरणीय व वंदनीय संस्थापक व राजे श्री शिवाजीमहाराज ह्यांचा इ. स. १६७४ साली बनारसच्या विख्यात महामहोपाध्याय वेदशास्त्रसंपन्न महापंडित गागाभट्ट ह्यांचा हस्ते जो राज्याभिषेक झाला तो इतिहासात सुप्रसिद्ध व सुविश्रुत आहेच. तथापि त्यानंतरच्या तांत्रिक विधींनी झालेल्या त्यांच्या द्वितीय राज्याभिषेकाची माहिती अलीकडे काही वर्षापूर्वीपर्यंत जनतेला नव्हती.

ह्या द्वितीयराज्याभिषेकाचे साद्यंत, तपशीलवार व विस्तृत वर्णन श्री. गोविंद नारायण भट्ट बरवे ह्यानी 'शिवराज राज्याभिषेक कल्पतरु' ह्या संस्कृत भाषेत तयार केलेल्या व नुकत्याच उपलब्ध झालेल्या हस्तलिखितात केलेले आहे. ह्या हस्तलिखिताची मूळ प्रत बंगाल एशियाटिक सोसायटीच्या कलकत्ता येथील ग्रंथसंग्रहालयात ( क्रमांक जी १०१८५ ) ठेवण्यात आली आहे. प्रस्तुत लेखकाने जातीने ती ताडून पाहिली आहे. पुण्याच्या भारत इतिहास संशोधक मंडळाच्या १९२९ च्या मार्च–जून वर्ष १० अंक १ ह्या त्रैमासिकात तिचे प्रकाशन झाले होते. संस्कृतातील ह्या लेखाच्या आधारे नामवंत इतिहासाचार्य सर यदुनाथ सरकार ह्यांनी "शिवाजी आणि त्यांचा काळ" ह्या आपल्या सुप्रसिद्ध ग्रंथाच्या १९४८ मधील चवथ्या आवृत्तीच्या नवव्या अध्यायातील ९ व्या प्रकरणात ह्या "द्वितीय" राज्याभिषेकाचा वृत्तांत ग्रथित केला आहे. परंतु आश्चर्याची गोष्ट ही की, दोन दशकांपूर्वी झालेल्या ह्या संशोधनाकडे सर यदुनाथ सरकार आणि म० म० पांडुरंग वामन काणे ( ह्यांचा धर्मशास्त्राचा इतिहास खंड ३ रा, पान ८१ पहा ) ह्यांच्या व्यतिरिक्त इतर कोणाही इतिहासकोविदाचे लक्ष्य वेधले नव्हते. ह्या ग्रंथाची विभागणी आठ अध्यायात केली आहे.

ग्रंथाचा मथळा वाचून कोणाचा भलताच ग्रह होईल की गागाभट्टाच्या हस्ते झालेल्या राज्याभिषेकाचे हे वर्णन असावे. खरा प्रकार असा आहे की गागाभट्टाच्या हस्ते वैदिकविधीनुसार झालेल्या राज्याभिषेकानंतरच अमळशाने हा राज्याभिषेक तांत्रिक विधीनुसार झाला होता व त्याची माहिती शिवाजीच्या समकालीन निश्चलपुरी ह्या महान तांत्रिक पुरोहिताने गोविंदानामक दुसऱ्या एका ब्राह्मणाला कथन केली होती. त्याचाच ह्या "शिवराज राज्याभिषेक कल्पतरु" ग्रंथाशी संबंध आहे. गागाभट्टाच्या हस्ते झालेल्या राज्याभिषेकाच्या बाबतीत ज्या उणीवा व दोष राहून गेले त्याचा ऊहापोह करुन शिवाजीला मंगल व प्रासादिक प्रेरणा देणाऱ्या तेजस्वी शक्तीच्या द्वारे तांत्रिक विधीने त्या दोषांचे कसे निराकरण केले ह्याचे वर्णन निश्चलपुरींनी केले आहे. त्यावेळी पुरोहित वर्गात दोन प्रतिस्पर्धी तट होते– एक वैदिक सांप्रदायिकांचा व दुसरा तांत्रिक किंवा शाक्तसांप्रदायाचा. पहिल्या राज्याभिषेकाचे पौरोहित्य वैदिक सांप्रदायिक गागाभट्टाला दिल्याने तांत्रिक सांप्रदायिकांचे पुरस्कर्ते अध्वर्यू निश्चलपुरी ह्यांचा पित्तप्रकोप झाला. त्यातच पहिल्या राज्याभिषेकाच्या समारंभप्रसंगी निश्चलपुरींनी धाडलेल्या तांत्रिक भिक्षुकांचा अपमान झाला व त्या समारंभानिमित्त जो दानधर्म वैदिक भिक्षुकांना करण्यात आला होता; त्यात ह्या तांत्रिक भटाभिक्षुकांची पंढरी न पिकल्याने जो निश्चलमहाराजांचा रोष झाला, ह्याची भरच पडली. निश्चलपुरींच्या मते पहिल्या राज्याभिषेकाच्या पाठोपाठ जी संकट परंपरा कोसळली तिला कारणीभूत असणारी गोष्ट म्हणजे भूतपिशाचादी आणि देवतादी अदृश्य सृष्टीतील प्राण्यांची तांत्रिक विधीनुसार थातुरमातुराद्वारे 'क्षुधाशांति' करण्यात झालेली कुचराई किंवा गल्लत होय. ह्या अनर्थपरंपरेने गांगरुन जाऊन व तिचा प्रतिकार किंवा निरसन व्हावे ह्या विचाराने शिवाजी राजांनी दुसरा राज्याभिषेक तांत्रिक विधीनुसार करवून घेण्यास संमती दिली. निश्चलपुरीने अशा प्रकारे आपला कार्यभाग (मतलब) साध्य झाल्याचा समाधानाचा सुस्कारा सोडून शालिवाहन शके १५९६ आश्विन शुद्ध पंचमी (ललिता पंचमी) ला (इ. स. १६७४ सप्टेंबर








२४ दिनांकी ) तांत्रिक (शास्त्र) विधीनुसार शिवाजी राजांना राज्याभिषेक केला. आपल्या 'शिवाजी' (४ थी आवृत्ति पा. २०९ वर) ह्या ग्रंथात सर यदुनाथ सरकार ह्यानी प्रतिपादिल्या-प्रमाणे 'ह्या ग्रंथाने भटाभिक्षुकातील जातिवैमनस्य लोभमूलक माकडचेष्टा ह्यांचे क्षुद्र प्रदर्शन' उघडे केले आहे.

ह्या द्वितीय राज्याभिषेकाच्या तिथीला 'निधन शकावली' ह्या ग्रंथाने दुजोरा दिला आहे. बुधवार असा तिथीचा वार दिला असला तरी हिंदुपंचांगात ती विवक्षित ललितापंचमी गुरुवारी आल्याचे दाखविले आहे. वारांच्या बरवर दिसणाऱ्या तफावतीचे मूळ शोधू गेले असता असे आढळून येईल की ही वास्तविक तफावत नसून तांत्रिक संप्रदायाच्या सूर्यास्तापासून दिनक्रमाचा प्रारंभ झाल्याच्या कालगणनात्मक पद्धतीच्या भेदात आहे. सप्तकोटीश्वराचे पुनरुत्थापन, काशीबाई राणीचा मृत्यु आदी प्रसंग ऐतिहासिक दृष्ट्या अचूक नोंदलेले आहेत मात्र कालविपर्यासात्मक असे एक ढळढळीत उदाहरण आहे व ते म्हणजे प्रतापगड किल्लचावरील आगीचा उल्लेख होय. निश्चलपुरीच्या विधानाप्रमाणे ही आग पहिल्या ( वैदिक ) राज्याभिषेकानंतर लागली तर शिवपुरी यादीसारख्या ऐतिहासिक कागदपत्रानुसार ही आग इ. स. १६७५ सप्टेंबर २५ दिनांकी म्हणजे राज्याभिषेकानंतर बरोबर एकवर्षानंतर लागली.

राज्याभिषेकसमयी शिवाजीच्या आपल्या पत्नींशी झालेल्या विवाहांचा उल्लेख हा फारच महत्वपूर्ण आहे. कारण ह्या उल्लेखामुळे शिवाजींनी अति उशीरा लग्ने केली. हा अनेक इतिहासकारांनी शिवाजीच्या विरुद्ध केलेला आरोप खोटा पडतो. हा आरोप जर साधार ठरता तर त्यामुळे शिवाजीच्या इतर अंगानी उज्वल असलेल्या चारित्र्याला कलंक लागता. आपला राज्याभिषेक पवित्र विधिपूर्वक करवून घेण्याची पात्रता सिद्ध करण्यापूर्वी आपण क्षत्रिय कुलोत्पन्न आहोत हे त्याना शाबित करावे लागले ही घटना सर्वश्रुत व सुप्रसिद्ध आहे. आणि ही पात्रता व आपले क्षत्रियत्व त्यांनी गागाभट्टाच्या मदतीने सिद्ध केले. म्हणून साहजिकच क्षत्रियाला आनुषंगिक व विहित असे सर्व संस्कार त्यांना करवून घ्यावे लागले. ह्या संस्कारातील एक अंग म्हणजे त्यानी पूर्वी केलेले विवाह आता परंपरागत रास्त वैदिक विधींनुसार उजवून समारंभाने साजरे करणे हे होय. तथापि ह्याचा अर्थ असा नव्हे की ह्या राज्याभिषेकाच्या निमित्ताने त्यानी पूर्वी केलेल्या विवाहात आणखी नवीन विवाहाची भर घातली. वास्तविक ही पूर्वीच्या विवाहाची योग्य वैदिक विधिपूर्वक झालेली उजळणीच होय. ह्या ग्रंथाची भाषा ही बहुतेक सोपी व साधी आहे. त्यात काही व्याकरणाच्या दृष्टीने प्रमाद राहून गेले आहेत. काही तुटक भाग वगळले आहेत. प्रस्तुत लेख हा काटेकोर शब्दशः भाषांतरापेक्षा अर्थबोधसूचक चिकित्सापूर्वक केलेल्या अनुवादाचा एक प्रयोग आहे. आणि त्या भूमिकेवरूनच वाचकांनी त्याकडे पहावे.

## श्रीशिवराज राज्याभिषेक कल्पतरु

### शाखा– १ ली

परमपूज्य गणेशाला नमन असो.

नगकन्या उमा, तिचा प्रियकर उमाकांत, व उमाकांतपुत्र ह्यांना वंदन करून दीप्तिमान व तेजस्वी शिवराजाच्या राज्याभिषेकाच्या विधीचे–संस्काराचे वर्णन करण्यात येत आहे.

एका विद्वान निश्चल नामक ब्राह्मणाला पवित्र तीर्थक्षेत्रांची यात्रा करण्याची इच्छा झाली. हा ब्राह्मण सर्व सिद्धान्तांचा अर्थ व मर्म जाणण्यात पारंगत होता. सत्यासत्याचे खरे रहस्य उमगलेला तो एक सत्पुरुष होता. त्याचे यजुर्वेदाचे अध्ययन झाले होते. जीवनाच्या पहिल्याच टप्प्यात त्याला विरक्तावस्था लाभली होती. त्याला पुत्रसंतान नव्हते. व एकमेवत्वाच्या ज्ञानाच्या परमानंदामुळे त्याचे जीवनातील धर्म, अर्थ, काम, मोक्ष ही ध्येये साध्य झाली होती. असा हा गुणसंपन्न साधुतुल्य पुरुष आपल्या इच्छापूर्तीनिमित्त एका खाऱ्या महासागराच्या किनाऱ्यावर वसलेल्या दांभोली शहरी रैरी पर्वतावरून आगमन करता झाला. तेथून पंचनद ग्रामाला भेट देऊन पवित्र क्षेत्र भार्गवाला आला. तेथे रेणुकापुत्राला वंदन केल्यावर त्याला फारच हर्ष झाला. येथून तो संगमेशाचे दर्शनसुख घेण्यासाठी मार्गस्थ झाला. संगमेश हे क्षेत्र काशी ( वाराणशी)



अनुक्रमणिका






इतकेच अति पवित्र आहे. तेथे ३६० सुरेख मंदिरे असून हे क्षेत्र पुरातन काळापासून प्रसिद्ध आहे.

त्यानंतर इतर स्थानांप्रमाणेच निर्वैरक ग्रामास त्याने भेट दिली. ह्या क्षेत्री महासागराच्या काठावर सकल विघ्ननाशक, यशदात्या व परमोच्च गणाधीशाचे वास्तव्य आहे. गणाधीशाचे दर्शन घेतल्यावर हा ज्ञानी पुरुष धूतपापेश्वराला मार्गस्थ झाला. धूतपापेश्वर हे एक असे पवित्र क्षेत्र आहे की जह्नु = ( जान्हवी गंगा नदी ) ची कन्या तेथून अविरतपणे वाहत असते. काही काळपर्यंत ही नदी प्रगटपणे वाहत असते. तर काही काळ ती प्रच्छन्नपणे वाहते. ह्या कर्मभूमीच्या सान्निध्यानुषंगाने ह्या नदीला जे महत्व प्राप्त झाले आहे त्यामुळे ह्या नदीत स्नान करणाऱ्याला शंभर अश्वमेधयज्ञापेक्षाही अधिक पुण्य घडते. ( अशी समजूत आहे. )

येथील सर्व पवित्र देवस्थानांचे दर्शन घेतल्या-नंतर त्याने सप्तकोटीश्वराकडे प्रयाण केले. ह्या ठिकाणी राजा शिवाने एक उत्कृष्ट देवालय बांध-विले आहे. ते दूर अंतरावरून दिसू शकते व ते कैलास पर्वतासारखे भासते. जुन्या किंवा पुरातन देवालयांचा जीर्णोद्धार करणे हे नवीन देवस्थान बांधण्यापेक्षा लक्षावधी पटीने अधिक पुण्यकारक किंवा श्रेयस्कर आहे. ह्या भावनेने प्रेरित होऊन ह्या थोर नृपतीने सप्तकोटीश्वराच्या नावाने एक सुंदर देवालय बांधविले. येथे पंचगंगेच्या प्रवाहात सदैव महाचमत्कार दिसत असतो. श्रावण वद्य अष्टमीस बिल्वपत्रांचा उदय होऊ लागतो. जेव्हा ती मावळू लागतात तेव्हा एखादा दरवाजा उघडताना जसा आवाज होतो तसा एक मोठा व चमत्कारिक आवाज दहाव्या दरवाजातून निघू लागतो.

गंगामाईच्या पात्रात स्नान केल्यावर सप्तकोटी-श्वराला यथोचित विधीपूर्वक वंदन करून संत निश्चलाने रायरीला जाण्याचे नक्की केले. कोकणातील पवित्र क्षेत्रे सपत्निक पहाण्याची इच्छा असलेल्या एका गोविंदानामक ब्राह्मणपंडिताची कुडाळ ग्रामच्या कुडाळेश्वराच्या देवस्तानचे दर्शन घ्यावयास आलेल्या निश्चलाशी गाठ पडली. गोविंदाची ह्या पूर्वीच निश्चलपंताबरोबर काशी-क्षेत्री भेट झाली होती. त्यावेळी "महाराज, आपण कोठे निघालात ?" अशी प्रेमपूर्वक पृच्छा केली. 'कल्पतरू'ची ही प्रथम शाखा असून तिच्यावर तेजस्वी व थोर नृपती शिव ह्यांच्या राज्याभिषेकाचे निरूपणाचे पल्लव आहेत. हे निरूपण नारायणभट्ट वर्वेसुत विद्याभूषण गोविंदा ह्या पंडिताच्या मुख-कमलात वास्तव्य करीत असलेल्या अनिरुद्ध वाग्देवीचा प्रसाद आहे.

## शाखा २ री

गेल्या शाखेत येऊन गेलेल्या गोविंदाने पृच्छा केल्यावर साधुपुरुष निश्चल म्हणाला, ' ज्या अर्थी तू माझ्या कृपेस पात्र आहेस त्या अर्थी तुला कथन करितो ( तुझ्या प्रश्नाचे उत्तर देतो ).

निश्चल म्हणाला : 'शहा' (जी) चा महाउदार चरित सुत थोर अंतःकरणाचा, यशवान व दीप्तमान नृपति रायरी पर्वतावर वास्तव्य करतो. हे भूदेवा त्याच्या शेजारातच माझी वस्ती आहे. नृपति शिवाच्या राज्याभिषेकासाठी त्या ठिकाणी माझे प्रस्थान व्हावयाचे आहे.

गोविंदा म्हणाला : "आपण वर्णाश्रमधर्मविहित गृहत्याग ( संन्यास ) केलेला आहे. आपणासारख्या आपखुषीने त्रिगुणातीत मार्गक्रमण केलेल्या सिद्ध पुरुषाने नृपतींच्या सान्निध्यात वास्तव्य करण्याचा हा वरपांगी देखावा करण्यात काय मतलब आहे ?"

गोविंदाचा हा प्रश्न ऐकून निश्चलपुरी म्हणाला : "हा राजा काही सामान्य मनुष्यप्राणी नाही परंतु हा शिवाचा अवतार आहे. त्रिगुणातीत असलो व सर्वसंगपरित्यागजन्य परमानंदात रममाण झालो असलो तरी छत्रपतीबद्दलच्या निष्ठेने मी बद्ध झालेला आहे."

गोविंदा उवाच : आपल्या म्हणण्याप्रमाणे हा राजा शिवाचा जर पूर्णावतार असेल तर मग पुण्य-वान पुरुषांच्या माथ्यावर झळकत असलेल्या दीप्ति-मान ज्योतीची आख्यायिका पवित्र मानली पाहिजे. हे सिद्धपुरुषा तुम्हाला ती आख्यायिका योगाभ्यासा-मुळे प्राप्त झालेल्या अंतर्ज्ञानाने ठाऊक असेलच. तेव्हा तो राजा कसा झाला हे मला कृपा करून सांगा.

ही विनंति ऐकताच त्या योगसंपन्न निश्चलपुरी महापुरुषाने ' छत्रधारणविधीचे निरूपण मोठ्या रसभरित वक्तृत्वपूर्ण भाषेत सुरू केले.



अनुक्रमणिका

निश्चल उवाच : "पृथ्वीचा निःपात करू पहाणाऱ्या व देवदेवतामूर्तिभंजक दुष्टमनस्क मानवी प्राण्यांचा संहार करण्यासाठी शिवराजाच्या रूपाने पृथ्वीतलावर अवतीर्ण झालेला हा प्रत्यक्ष शिव ( शंकर ) आहे. हा दुष्ट लोकांच्या अंमलाखाली अग्नि, होम, यज्ञयागादि क्रियाकर्म ह्यांचा नायनाट झालेला होता. व स्नानसंध्यादि धार्मिक कार्यात ढवळाढवळ होत होती. ह्या आत्मसंयमी शिवाने पृथ्वीवरील राजांना पादाक्रान्त करून आपल्या अंमलाखाली आणून त्यांच्या लौकिकाला हरताळ फासला. आपल्या छत्राची कीर्ति दिगंत पसरविली. शिवाच्या राजवटीत महालाच्या दरवाज्यापाशी भिक्षेकऱ्याप्रमाणे हत्तीची रांग असे. ह्या हत्तीच्या गंडस्थळातून एक दिव्यरस ओघळत असे. पालख्या अंबाऱ्या असून राज्यात आबादिआबाद व शांतता असे; व शत्रूचे निर्दालन झाल्याने सैनिक सुखसमाधानात दंग होते.

"अशासमयी गागाभट्टाचे नाशिकास आगमन झाले. त्यांची स्वतःची कीर्ति पसरलेलीच होती. आणि आपल्या पूर्वजांच्या कीर्त्यनुषंगाने त्यांच्या लौकिकात भर पडली होती. ही त्यांची कीर्ति शिव (राजा)ला अवगत असल्यामुळे त्यांनी त्यांना बोलावणे धाडले. व आपल्या आगमनानंतर त्यानी राज्याभिषेकाची तयारी केली. तेव्हां शिवावतार राजाधिराज शिवाला जो आनंद झाला तो त्यानी सन्मानपूर्वक व्यक्त केला.

"त्याच्या आगमनानंतर काही दिवसांनी राजाची प्रिय राणी काशी ( बाई ) आपला मर्त्य देह सोडून आपल्या मूळठायी विलीन झाली ( मृत्यु पावली ). त्यानंतर शत्रूंचा सुविख्यात कर्दनकाळ प्रतापराणा ह्याचा यवनानी उच्छेद केला. तेव्हां जणू काय महासागर उल्लंघन करणाराच गौपदाखाली बुडाला गेला अशासारखे झाले.

"त्यासमयी सैनिकांना खूष करण्यासाठी भार्गव क्षेत्री बरेचसे सुवर्णदान करून महाराज रायरीला परतले. मग गागाभट्टाने राजाकडून पूर्व पापक्षालनार्थ प्रायश्चित्तादाखल मुबलक दक्षिणादान व गोप्रदान करविले." दुसऱ्या दिवशी दीक्षा घेत असता शत्रू व भयंकर प्राणी ह्यांचा अंतनिदर्शक असा एक तारा आकाशातून निखळून पडला. असा अशुभ प्रकार झालेला दिसल्याबरोबर हनुमानाचा मंत्र गाऊन शिवाचा धावा केला. व त्या अनिष्ठाला पायबंद घातला.

राजगुरूच्या मुखातून गागाभट्टाने गायत्री मंत्र म्हणविला. ह्या अशुभ समयीसुद्धा शिवाने ( महाराजानी ) गायत्री मंत्राचा भक्तिभावयुक्त आदराने स्वीकार केला."

"कल्पतरूची ही द्वितीय शाखा असून तिच्यावर तेजस्वी व थोर नृपति शिव ह्यांच्या राज्याभिषेकाच्या निरूपणाचे पल्लव आहेत. हे निरूपण नारायणभट्ट बर्वेसुत विद्याभूषण गोविंदा ह्या पंडिताच्या मुखकमलात वास्तव्य करीत असलेल्या अनिरुद्ध वाग्देवीचा प्रसाद होय.

## शाखा ३ री

"अशा प्रकारे महाराजांचे व्रतपालन चालू असता त्यांचे पूर्वीच विवाह केलेल्या पत्नीशी ह्या महोत्सवसमयी जमा झालेल्या मंडळींच्यासमोर पुन्हा विवाह करविण्यात आले ( हा प्रकार एका अर्थाने रौप्यविवाहसमान समजावयाचा ). दक्षिणार्थी अगणित भटभिक्षुक व वेदविद्यापारंगत असे सहस्रावधि ब्राह्मण त्या उत्सवाप्रीत्यर्थ गोळा झाले होते. महाराजांनी त्यांना मनमुराद व मनसोक्त धन-धान्य, वस्त्र-प्रावरणे देऊन संतुष्ट केले. त्या ब्राह्मणांना त्यांनी कर्जमुक्त केले. ज्या स्त्रिया रंगीत वस्त्रे नसल्यामुळे नाखुष झालेल्या व कुरकुरत होत्या त्यांच्या घरात अशा रंगीत वस्त्राचे ढीग पडले. त्यांना रंगीत वस्त्रे इतक्या प्रमाणात वाटण्यात आली की त्यांची मोजदाद करण्याची कोणाला पर्वासुद्धा वाटली नाही. जेव्हा शिवरूपी मेघाचा सुवर्णमय वर्षाव झाला तेव्हा भटभिक्षुकादि याचकांच्या वांच्छारूपी सरिता ओतप्रोत भरून वाहू लागल्या. व दारिद्र्याचे उच्चाटन झाले.

"याचकानी ज्या ज्या याचना केलेल्या त्या त्या सर्व मनःकामनांची पूर्ति करण्याचे राजा भोजाचे औदार्य हे सुप्रसिद्ध आहे. ( तथापि ) शिवाजी महाराजांचे औदार्य त्याहूनही कांकणभर अधिकच म्हणता येईल, ( कारण ) याचकांच्या इच्छेपेक्षाही












अधिक महाराजांव्यतिरिक्त दुसरे कोणीही दिले नाही. शिबी व कर्ण ह्यांचे (फक्त) मागितलेले वर तृप्त करण्याच्या औदार्याचा लौकिक होता. "नंतर ब्राह्मणांच्या संमतीने 'राजतुला' विधी सुरू झाला. तेव्हा आम्हाला विपुल धन प्राप्त होऊन आम्ही आमच्या संकल्पित मुक्कामाला जाऊ? असे म्हणत ते ब्राह्मण उपस्थित झाले. व शिवाजी महाराजांच्या 'तुलापुरुष' नामक महोत्सव समारंभाच्या निमित्ताने त्यांनी अलोट संपत्ति प्राप्त करून घेतली."

गोविंदाने पृच्छा केली: हे साधो, महाराजानी आपल्या खजिन्यातून त्या ठळक ठळक ब्राह्मणांना जी विपुल धन-दौलतीची खैरात केली तिचे उगमस्थान कोणते हे विदित करणे आपले कर्तव्य आहे."

निश्चल उवाच: "महाराजानी आपल्या मनात फार काळ असा संकल्प केला की " मी माझ्या शौर्याच्या बळावर महासागराच्या तळातून पृथ्वीच्या पोटातील जडजवाहीर माझ्या तिजोरीत संकलित केलेले आहे. आता ह्या पार्थिव जवाहिरांपेक्षा अधिक मौल्यवान असे पुण्य (श्रेयस्) रूपी जवाहीर ब्राह्मणांच्या ठायी वसत आहे. हे (ब्रह्मकोविद) ब्राह्मण पवित्र होमयागाचे जनन करण्यात व प्रार्थनादि मंत्रोच्चार करण्यात मग्न असून आपल्या बुद्धिप्रागल्भ्याने वेदांच्या अर्थाचा उलगडा करतात. हे त्यांच्या अंतर्यामी असलेले जवाहीर मला कसे काढून घेता येईल? प्रजेला लुबाडून किंवा जुलुम-जबरदस्तीने जसा द्रव्यसंचय करता येतो त्या शौर्याच्या व बळजबरीच्या मार्गाने हे पुण्यरूप जवाहीर हस्तगत करता येणे मला शक्य नाही. पुण्यस्वरूप जवाहीर हे कनकदान केल्यानेच प्राप्त होऊ शकते, अन्यथा नाही" आणि म्हणून ब्राह्मणांना सुवर्णदान केल्याने महाराजानी पुण्याचा ठेवा प्राप्त करून घेतला आहे. द्रव्य प्राप्त झाल्याने मात्र ब्राह्मणांना अत्यानंद झाला, धनलोभी ब्राह्मणांना आपला पुण्यक्षय झाल्याची कल्पनासुद्धा नव्हती. ते केवळ मौल्यवान पाचू हिरे टाकून गारगोट्या वेटाळण्यास धावतात.

"नंतर वेदमंत्र घोष करणाऱ्या भिक्षुकांना राज्याभिषेकाप्रीत्यर्थ बोलाविण्यात आले. ह्या भिक्षुकांतून वेदऋचागानासाठी आपल्याच माणसांची आपल्याच माणसांकरवी निवड केली. व मी धाडलेल्या भिक्षुकांची उपेक्षा केली म्हणजे त्यांना निवडलेच नाही. गागा, महाराजाना म्हणाला, 'पुरीपुढे मान वाकविता कामा नये.'

" 'तुला-पुरुष' विधी सोहळा होऊन महाराज घरी परतल्यावर एकाएकी तेथे अपघात झाला. हे ब्राह्मणोत्तमा, गागाभट्टाच्या नाकावर लाकडाच्या तुकड्याचा आघात झाला. आणि बाळंभट्ट गुरुजींच्या डोकीच्या केन्द्रस्थानावर ती अशुभ चीज पडली. भटभिक्षुकांनी द्रव्यलोभाने पुण्यविक्रय केला होता. त्याअर्थी त्यांचा पुण्यक्षय झाल्यामुळे एका खांबावर कोरलेले लाकडी कमळ एका ब्राह्मणाच्या डोक्यावर आदळले. ही सारी दुर्दैवी घटना ब्राह्मणांच्या पुण्यसंचय ऱ्हासाचे चिन्ह होती. प्रमुख खांब निखळला परंतु महाराजांच्या पुण्याईमुळे तो जमीनदोस्त झाला नाही. तेव्हा त्या जागी टेकू म्हणून चार खांब उभारण्यात आले.

" नंतर ब्राह्मणांनी जलसिंचन करून महाराजांना मुकुट चढविला.

हा कल्पतरूच्या तृतीय शाखेचा समाप्त होय.

## शाखा ४ थी

" त्यानंतर गागाभट्टाच्या अनुज्ञेनुसार महाराज गादीवर आरूढ झाले."

" जेथील सिंहासनावर ते आरुढ झाले होते त्या पर्वताच्या प्रमुख देवतेला बळी अर्पिला नव्हता. हे विप्रा, त्या क्षेत्रातील शिरकादेवीचीसुद्धा पूजा केलेली नव्हती. क्षत्रियसंहारक, प्रांताधिपति भार्गवरामास वंदन केले नव्हते. भूतांचा राजा जो वेताळ त्याला जसे प्रसन्न केले नाही तसच हनुमानाची भक्ति केली नाही. सिंहासनारोहण विहितमंत्रपूर्वक झाले नाही.

" सिंहासनाधिष्ठित महाविद्या महाराजांना देण्यात आली नाही. बलिदान झाले नाही. द्वाररक्षक देवतांची शांति केली नाही. सत्पात्र ब्राम्हणांना पंचपक्वान्नाचे भोजन घालून तृप्त केले नाही. की भूतपिशाच्चादी कनिष्ठ योनीतील अदृश्य प्राण्यांना



अनुक्रमणिका

खाद्य दिले नाही. " " ग्रहांच्या विपरीत युतीसमयी एका अयोग्य क्षणाला अशुभ तारे व दुष्ट नक्षत्रे ह्यांच्या अंमलाखाली गागाभट्टाच्या उद्दामवृत्तीमुळे राजदरबारात महान संकटे निर्माण झाली. परंतु ह्या सर्वांचे निराकरण महाराज शिवाजी हे साक्षात् शिवाचे अवतार असल्यामुळेच झाले. नाही तर हे कसे व्हावे ? "

" महाराज सिंहासनारोहण करण्याच्या क्षणाला कोणीसा आग्नेय दिशेला बसलेला शिंकला. संभाजीच्या डोकीवरील मंदिलातील दोन मोत्ये गळून पडली. महाराजांच्या बाजूला ठेवलेली कटचार नागवी होती. शिंकणे काही विशेष भाकितसूचक नाही; परंतु नागवी कटचार शत्रुपराजयसूचक भाकीत वर्तविते."

" अंमळशाने सुवर्णखचित मजबूत करण्याचा, उत्तम घोडे लावलेला व सुंदर दांडा असलेला रथ आणण्यात आला. तेव्हा गागाभट्टाने महाराजाना आज्ञा केली, " महाराज, रथात पाऊल टाका ( बसा ). " परंतु इतक्यात त्याच्या मनात दुसराच विचार डोकावून गेला. ( आणि तो म्हणाला ) " महाराज, मी प्रथम ह्या रथात पाऊल टाकतो व मग तुम्ही त्यात बसा " महाराजांनी उत्तर दिले, मर्जी ( तुमच्या मनाप्रमाणे होऊ द्या ).

" महाराज म्हणाले, आपल्या कृपेने प्राप्त झालेल्या ह्या रथात आरूढ होऊन मला पृथ्वी पादाक्रांत करावयाची आहे. तेव्हा आपण अविलंबे आरूढ व्हा. " " गागाभट्ट रथारूढ झाल्यावर महाराज त्यात बसले, हे होत असता उपस्थित मंडळी प्रेक्षकाप्रमाणे टकमक पहात होती

" ( चाऱ्ही ) जगपालकांचे अधिष्ठान फक्त शिवाजीमहाराजामध्येच आहे. त्यांच्या वजनामुळे रथ भारावून खाली वाकला. महाराज एका डौलदार हत्तीवर स्वार झाले. हा खरोखर प्रेक्षणीय देखावा होता. इंद्रदेव ऐरावतावर आरूढ झाल्यावर जशी त्याची भाटांनी स्तुती केली, त्याचप्रमाणे दरबारी लोकांनी महाराजांची स्तुती करता करता त्यांना कुबेराच्या पंक्तीस बसविले.

" महाराजांनी आपल्या लक्षाचा नेम धरून धनुष्याला बाण लावताक्षणीच त्यांच्या करंगळीतील आंगठी निसटून खाली पडली. त्यांचा मुख्य जासूद ( हुजऱ्या ) दत्ताजी हा कोलमडून जमिनीवर पडला. अंगुठीपतनाचे रहस्य तेथे उपस्थित असलेल्यापैकी कोणालाही उमगले नाही. "

गोविंदाने विचारले, " हे महासाधो, ह्या अंगुठीपतनाचे रहस्य काय ? हे समग्र आपल्या मुखकमलातून श्रवण करण्यास मी उत्सुक आहे. "

निश्चल उवाच, " त्या अंगठीने स्वगत विचार केला की, ज्या अर्थी महाराजांनी आपल्या लक्ष्यात्र नेम धरण्यास्तव तीरकमठचाचा बाण दगडावर पाजळला त्याअर्थी महाराजांच्या चोहोकडील शत्रूंची शिरे माझा गळफास करून मी त्यांच्या चरणापाशी आणीन. " जणू काय ह्याच कामगिरीवर आंगठी गेली ( हातातून दूर होऊन खाली पडली ) व त्यांच्या करंगळीत परत आली. ह्या अति दिव्य ( रहस्यमय ) मुद्याचे इतराना आकलन झाले नाही.

ह्या उदारचरित नृपतीचा अशा रीतीने भौतिक पद्धतीनुसार राज्याभिषेक होत असता ( आणि हे ब्राह्मणा, दुःश्चिन्हांचे परिणाम निरास पावले तेव्हा ) मी निश्चलपुरी ह्या नावाला साजेसा निघून जाण्याचा निश्चय केला.

ही चतुर्थ शाखा समाप्त होय.

## शाखा ५ वी

राज्याभिषेकानंतर महाराज आपल्या राजवाड्यात परतले. म्या निश्चलमुनीने एका शिष्याला बोलावून त्याला सांगितले की, 'जा आणि महाराजांना म्हणावे की मी आपखुषीने ( त्राग्याने नव्हे ) जात आहे. मी राज्याभिषेक झालेला पाहिला असून मी अंतःकरणापासून प्रसन्न झालो आहे. ह्या शिष्याने राजवाड्यात त्याप्रमाणे सांगितले व म्हणाला, " हे राजन् जपजाप्य करणारांचे शिरोमणी निश्चलपुरी पृथ्वीपर्यटनास जाण्यासाठी आता उत्सुक झालेले आहेत. हे विषादकारक उद्गार ऐकताच महाराज ताडकन् जाग्यावरून उठले. व निश्चलपुरीपुढे एक ( श्री ) फळ ठेवून त्याच्यावर साष्टांग नमस्कार करते झाले. हे ब्रह्मन् मग त्याना शुभाशीर्वादाने प्रोत्साहन देऊन मी त्यांना काय काय घडणार हे सांगून टाकले.








"हे राजन् तेराव्या, बाविसाव्या पंचावन्नाव्या व शिवाय पासष्ठाव्या दिवशीसुद्धा भावी संकटाची अवचिन्हे दिसू लागतील. महाविद्या (अवगत) असल्याविना सिंहासनावर बसण्याचा तुला अधिकार नाही. आणि म्हणून मला मोठी चिंता लागून राहिली आहे. वेदांची जननी जी गायत्री तिचे सिंहशिरी अवलोकन केल्यावर ती तेथे कशी राहू शकेल, ह्याची मला काळजी पडली आहे. ह्याचे कारणास्तव मी तीर्थयात्रेला जात आहे. व वाराणसीत वास करणार आहे. येथे माझे मन कशातही रमत नाही. "माझे हे काहीसे विस्मयकारक बोल ऐकताच महाराजांनी आपले मस्तक माझ्या पायावर ठेवले. व ते विनवणी करू लागले."

गुरुजी ज्या अर्थी तुमचा मजवर लोभ आहे. त्याअर्थी तुम्ही माझा तांत्रिक विधीनुसार राज्याभिषेक करा (वास्तविक) वेदशास्त्रानुसार राज्याभिषेक झाल्यानंतर तांत्रिक विधीने तो व्हावयास पाहिजे. (माझ्या बाबतीत) वेदशास्त्रानुरोधाने तो झालेला आहेच. तथापि तांत्रिक विधिपूर्वक तो आता व्हावा अशी माझी मनीषा आहे आणि माझी तुमच्या ठायी भक्तिभावना असल्यामुळे तुम्ही येथून कसे निघून जाऊ इच्छिता ?

"शिवाजी महाराजांच्या ह्या वचनावर मी (त्याना) म्हणालो, "हे राजा, कथन केल्याप्रमाणे भवितव्याची चिन्हे दिसू लागताच तू मजकडे लगबगीने ये म्हणजे सर्व संकटाचा परिहार होऊन सर्व काही ठीक होईल."

"मी राजाला अशा प्रकारे सांगितल्यावर, महाराज आपल्या सुंदर राजवाड्यात गेले. त्यानंतर त्यापासून तेराव्या दिवशी सद्‌गुणी राजमाता वारली. त्याउप्पर महाराजांचे लाडके व मोलवान घोड्याची प्रतापगिरी (किल्ल्याची) पागा अग्निमुखी पडली. सिंहाच्या रांगेत उभा राहू शकणारा हत्ती झूल व शस्त्रादि साहित्यासह जळाला. पृथ्वीचा निःपात करण्यात आणि तिला पादाक्रांत करण्यात निष्णात असलेल्यांनी त्यांचे देह काबीज केले.

त्या स्थळी अशी कितीतरी दुश्चिन्हे दृष्टोत्पत्तीस आली. "काही दिवस जाऊ देत म्हणजे सर्व काही ठीक होईल हे माझे उद्‌गार ध्यानात ठेऊन व ती दुश्चिन्हे पाहून तो महाबुद्धिवान सामर्थ्यवान राजा काही दिवसांनी मजकडे आला व मला म्हणाला, "परमपूज्य गुरुजींनी पूर्वी उच्चारलेले अमृततुल्य वचन आता पुरे करावयास हवेत. कारण आपण आपल्या प्रजाजनांचे निःसंशय हितकर्ते आहात. राजाच्या ह्या विनवणीला मान देऊन मी तांत्रिक विधीनुसार राज्याभिषेकसमयी मंत्रोच्चार करणारे ब्राह्मण निवडले. शिवाजी महाराजाला वैभव प्राप्त व्हावे म्हणू त्या ब्राह्मणांना तांबडे पाट, तांबड्या-रंगाची वस्त्रे व सुवर्णनाणी देवविली.

"क्षितिजावर शुभदिनी राशिचक्र शुभस्थानी झाले असता नक्षत्रांच्या व प्रबळ ताऱ्यांच्या शुभयुतिसमयी शुभक्षणाला भिक्षुकांनी मंत्रयुक्त प्रार्थना म्हणण्यास प्रारंभ केला. "चतु:षष्ठी तंत्रातील सिद्धान्तांचा पाठ गाऊन आणि एक विशुद्ध जागी (शत्रूला काबूत आणू शकणाऱ्या) सिद्धरीच्या चक्राकृतीत उत्तमोत्तम मंत्राचे आरोपण करून मी महाराजांना हा संपूर्ण मंत्र देण्याचे अशाप्रकारे ठरविले की त्यांना त्याची फिरून फिरून शुद्धि करण्याची जरूरी पडू नये. महाराजांना मी देत असलेल्या व विशुद्ध ठायी योग्य प्रकारे अधिष्ठिलेल्या ताईताची फलश्रुति काय आहे हे विशद करून पंधरा दिवसापूर्वी मी तो त्यांच्याकडे धाडला. "(ही फलश्रुति म्हणजे) तुझे शत्रू (प्रतिस्पर्धी) तुझ्या हाती पडतील, (त्याचे) हे लक्षण होय. असे माझे भविष्यकथन आहे." त्यावेळी ते खरे ठरले. तुकाराम त्यांच्या हाती लागला. त्याप्रमाणे त्या महामंत्राचा प्रभाव सम्राट वैभव दिग्दर्शक झाला.

"दीक्षा घेण्यास आतुर असलेल्या महाराजांनी दीक्षा घ्यावयाच्या समयी पुरोहितांना बोलावून सांगितले की,

"माझा निश्चलपासून महाविद्येची दीक्षा घेण्याचा मानस आहे. तेव्हा तुम्हास ते पसंत आहे काय ?

"त्यावर त्या ब्राह्मणांनी आपापसात विचार-विनिमय केला व ते म्हणाले" त्यांना राज्याभिषेक-विधीची पूर्णता करू द्या. मात्र दीक्षा घेऊ नका. (केवळ) गायत्री (मंत्र) ऐकूनच मोठी मानसिक खळबळ निर्माण झालेली आहे. मंत्रिलेल्या ताईताने आणखी काय काय घडेल हे आम्ही वर्तू शकत नाही.



अनुक्रमणिका






म्हणून हे राजाधिश्रेष्ठा निश्चलसाधूपासून आपण तांत्रिक विधिपूर्वक दीक्षा घेण्याला आमची संमति नाही. " राजाच्या मनाविरुद्ध असलेला हा अभिप्राय ऐकून आपले (भावी) हित साधावे म्हणून राजाने त्यांचा सल्ला मानला नाही.

## शाखा ६ वी

निश्चल उवाच : "सकाळी पहाटेस उठून मी कलशाचे अधिष्ठान केले व मग तांत्रिक विधिपूर्वक पूजा केली. सुंदर रंगांनी सुशोभित केलेले मेरुयंत्र उचलून मी आश्विन शुद्ध पंचमीच्या शुभ मुहूर्तावर राज्याभिषेक केला. विश्वकर्म्याने बांधलेला इंद्राचा महाल जसा सुशोभित केला होता, तसाच सुरेख खांब व छताने युक्त असलेला मंडप शृंगारला होता." स्वहिततत्पर अशा त्या राजाने प्रथमतः मंडपातील कलशांचे पूजन केले. व रत्नखचित सिंहासन विहित-विधींनी शुद्ध केल्यावर आपल्या हातात एक आरसा घेतला. व त्यात आपले तोंड पाहून आपल्या कृत्याचा अर्थ ते समजावून सांगू लागले. ते म्हणाले, "अहो ब्रह्मवृंद जनहो, तुम्ही सर्वजण माझे भाषण नीट ऐका. ते ऐकून तुम्हाला आश्चर्य वाटेल. हा आरसा कोणी बनविला ?" ह्या त्यांच्या प्रश्नाला 'लोहाराने' असे त्या ब्रह्मवृंदाने उत्तर दिले. महाराजांनी विचारले हे प्रतिबिंब कोणी दाखवले ? तेव्हां 'कारागिराने' असे उत्तर आले. चर्येवर काहीसे अस्फुटस्मित दाखवून महाराजांनी पुनः प्रश्न केला. आरसा कसा बनवितात ? हे तुम्हाला अवगत असेल परंतु त्यात प्रतिबिंब कसे पाडावयाचे ह्याबद्दल तुम्हाला माहिती नाही. माझ्या मते प्रतिछाया दाखविण्याचे कौशल्य कारागिराच्या कसबात असते." एवढा खुलासा केल्यावर त्यानी त्यांच्या सल्ल्याचा विचार केला नाही. "( सिंहासनावर ) दुसरे आसन मांडल्यावर मंत्रसामर्थ्याने ह्या सिंहासनावर कोरलेल्या सिंहांच्या अवयवात त्याने प्राण ओतला. मी योगी असल्यामुळे राजाला आवाहन केले. राजाने प्रातःकालची विहित कर्मे केल्यावर तो हातात तरवार घेऊन राजदरबारात गेला.

"द्वाराशी ठाकलेल्या देवतांना त्यांनी अर्घ्य दिले." त्या जगत्‌रक्षकांना संतुष्ट केल्यावर त्यानी आनंदाने महाराजांचा मार्ग मोकळा केला. लक्षावधी ब्राह्मण व विद्वान पंडितांना भोजनाने तृप्त केल्यावर गागाभट्टाने उभारलेल्या आसनाचा विध्वंस करण्यात आला." द्वारस्थ संरक्षक देवतांना संतुष्ट केल्यामुळे त्यानी सर्व संकटाचा परिहार केला.

"मग महाराज दरबारात घाईने येऊन मला प्रणिपात करीत विनंतिपूर्वक विचारू लागले की, "आपल्या देखरेखीखाली मी काय करावे अशी आपली आज्ञा आहे ? "मी सांगितले, "हे राजा, त्या सिंहाना बलिदान कर, मग तुझ्या मनाला स्वस्थता वाटून तुला सुख लाभेल." "माझे हे वचन ऐकून राजा उल्हसित झाला. मग त्याने माझ्या सल्ल्याप्रमाणे दान केले."

गोविंदा उवाच : "हे साधुश्रेष्ठा, ( आपण ) कथिलेले हे सिंह कोण, त्यांची नांवे काय व त्यांचे वास्तव्य कोठे आहे ? हे सर्व मला कथन करा व शिवरायाचा जीवनवृत्तांत सांगा."

निश्चल उवाच : "सिंहासनाच्या खाली बसविलेल्या सिंहाची नावे त्यांना बलिदान केल्याप्रमाणे क्रमानुसार मी सांगेन."

"प्रथमतः पूर्वेकडे उभा असलेल्या सिंहाला महाराजांनी बळी दिला. हा सिंह चरूने तृप्त झाला की तो पूर्वदिशेचे दक्षतेने रक्षण करतो. हरिणाक्ष आग्नेय दिशेकडे असतो. त्याला राजाने जनावराचे बलिदान केले. तो संतुष्ट होऊन त्या दिशेचे रक्षण करू लागला.

"यमाला ज्याचा दरारा तो पंचास्य दक्षिणेस ठेवण्यात आला आहे. तो सुद्धा अशा प्रकारे तृप्त होऊन दक्षिण दिशेचे संरक्षण करतो.

"नैॠत्येला 'केसरी' असून त्याच्यावर त्या दिशेकडील भागाच्या रक्षणाचे कार्य आहे.

"पश्चिमेस मृगेन्द्र असून त्याचे कार्य सिंहासनाचा एक अष्टमांश भाग रक्षणाचे आहे.

"वायव्येकडील सिंहाचे नाव शार्दूल. त्याचे काम ती दिशा रक्षावयाचे आहे.

"गजेन्द्राची नेमणूक उत्तरेकडे असून त्याला खाद्य दिल्यामुळे खुषीत आल्यावर तो त्याच दिशेला कुबेरावर गर्जतो.

"ईशान्येस हरीची योजना असल्याने रात्रंदिवस न झोपता किंवा न कंटाळता तो त्या दिशेची राखण करतो.



अनुक्रमणिका








" ह्या अष्ट सिंहाच्या पाठीवर राजाचे आसन किंवा गादी घातली होती. आणि ह्यास्तवच त्यास सिंहासन म्हणतात. ते मिळविणे ही ( कष्टसाध्य ) कठीण बाब आहे. विक्रमाचे 'सिंहासन' असा शब्द जनतेने ऐकला असेल. परंतु ते कोणीही पाहिलेले नाही, शिवरायाने मात्र ह्या सिंहासनाला जगापुढे आणले आहे. "मी सिंहासनावर 'यंत्र' ( मंत्राने भारलेला पदार्थ ) ठेवून दिले असून त्यात देवतेची प्राणप्रतिष्ठा केली आहे. सिंहासनापुढे बलिदान सुद्धा झालेले आहे.

" सर्व शस्त्रसंहारक अशा ह्या राजाने ह्या गादीवर बसन कोणत्याही दिशेकडे आपली वरी–वाईट नजर टाकली. तेव्हा त्या दिशेला असलेल्या लोकांची त्यात राजाचे काही गणगोत व काही शेजारी बसलेले असावेत– मस्तके नमून खाली झाली आणि कित्येकांच्या हातातील शस्त्रे गळून खाली पडली." ज्या अगणित भूतपिशाचादिकांना क्षुधाशांतिसाठी खाद्य पुरविले नव्हते त्यांच्यापासून रात्री झोपलेल्या पहारेकऱ्यांना उपसर्ग पोहोचला. मी त्यांना अंगारा पाठवून दिल्यामुळे त्यांचा बचाव झाला. नंतर एक चमत्कार झाला.

हिरण्यकश्यपूच्या छातीवर नृसिंहाची नखे जशी तळपत होती तद्वत् ( राजाच्या ) शत्रूंच्या छाताडावर नखे (त्यांच्या खुणा) दृग्गोचर झाल्या. पूर्वी सिंहासनापुढे बळी देत नसत. ह्या पापाचरणामुळे सबंध राज्यावर आपत्ति कोसळली होती. राज्याभिषेक झाल्यावरही महाराजांना महत्प्रयासाने झोप मिळू शके. प्रजेच्या अंतःकरणात त्यांच्याबद्दल भक्ति किंवा निष्ठा नव्हती. इतकेच नव्हे तर त्यांच्याबद्दल प्रजेच्या मनात अढी होती. राजमहालात आणखी बरीच दुश्चिन्हे दिसून आली. परंतु ही क्षणार्धात नाहीशी झाली व त्यांचा प्रताप मात्र उलट शत्रुगृहांना भोवला.

अशा प्रकारे सर्व राजे लोकांनी सन्मान दाखविलेले व भाटांनी स्तुतिस्तोत्रे गायिलेले सिंहासन तयार झाले. शिवरायाचे उंचावरील सिंहासन इंद्र, सोम, वरुण किंवा प्रजापति ह्यांच्या तोडीच्या आसनासारखे झाले. अशा सिंहासनाच्या पृष्ठभागावर झालेल्या आसनावर तळपत असलेला राजा समुद्रवेष्ठित अखिल पृथ्वी पादाक्रांत करण्यास समर्थ होतो.

**सप्तम शाखा**

निश्चल उवाचः "मग उच्चस्थानी असलेल्या त्या रत्नखचित आसनावर मी एक मौल्यवान रुप्याचा पाट ठेवला. व त्यावर राज्याभिषेकाप्रीत्यर्थ महाराजांना बसविले.

"आपल्या किरणात ( प्रकाशात ) अंतर्भूत असलेल्या अमृताचा वर्षाव चंद्र अखिल भूतलावर करीत आहे. ह्या अमृततुल्य प्रकाशाची छाया साऱ्या आठही कलशावर पडली आहे. ह्या कलशात पाच पाच देठ असून त्यांना लाल रेशमी कापडाची वेष्टणे होती.

"राजदरबार सोन्याचे भरतकाम केलेल्या चित्रांनी भरलेल्या छतांनी श्रृंगारला होता. उदाचा परिमळ दरवळत होता. दिव्यांचा झगझगाट व नानारंगी –विविध सुशोभित फुलांचा घमघमाट, असा तेथे थाट होता.

" शिवरायाच्या राज्याभिषेकाच्या क्षणाला वाग्देवीचे स्वरूप धारण करून शक्ती वर उल्लेखित पवित्र कलश हातात धारण करत्या झाल्या. पृथुराजाकडे राज्याभिषेक समयी ज्याप्रमाणे सर्व नद्या व सागर देह धारण करून उपस्थित झाले होते तद्वत् शिवरायाच्या मस्तकावर वर्षिनी प्रकृति महान पूजनीय विभूतींनी उपस्थित राहून मुगुट ठेवला.

"मग राजेश्वरी मंत्राची व ब्रह्मास्त्र विद्येची ज्या पीतवस्त्रगुंठित मधल्या कलशात मी प्रतिष्ठापना केली होती, तिच्यातील मंत्रित जलाचे मी पृथ्वीपती, प्रजापतिपाल, राजछत्राधिपति शिवरायाच्या शरीरावर दशविद्या भारून सिंचन केले. महाराजांना राज–राजेश्वरी मंत्राची प्राप्ती होऊ लागताच त्यांच्या संन्निध पूर्वीपासून असलेली जगन्माता भवानी प्रगट झाली. अशा प्रकारे शहा(जी) पुत्र शिवरायाचा मंत्रित व पवित्र जलसिंचनाने हा राज्याभिषेकोत्सव पुरा झाला.

गोविंदा विचारतो : "योगिश्रेष्ठा वाग्देवी व त्या इतर देवता कोण ? हे दयासागरा मला त्यांची नांवे ऐकावी वाटतात. तेव्हा ती कथन करा."

निश्चल उत्तरला : हे ब्राह्मणश्रेष्ठा, मी त्यांची नावे व त्यांच्या विभूती सांगतो. तू श्रद्धापूर्वक श्रवण कर."



अनुक्रमणिका

" प्रफुल्लित मुखकमल झालेल्या शिवरायाची विविध रंगी व सर्वप्रकारे शुभकारक अशा आसनावर मी प्रतिष्ठापना केली. राजाची अशा प्रकारे स्थापना केल्यावर मी त्याला म्हटले, " ह्या लोकांना घालवून दे.' त्यावर राजानजीक उभे असलेल्या दरबारी मंडळीला त्यानी घालवून दिले. हे ब्राह्मण, राजाच्या सचिवांसह दरबारी जनांना घालवून दिल्यावर शिवरायाच्या (शरीरभर) सर्व अवयवांवर अलंकार चढविण्यांत आले. ज्वलंत व शुभदायक मंत्रांच्या गाननिनादात अलंकार–भूषणे चढत होती व मंडपात ढोलासारखी वाद्ये वाजत होती. वेदविद्या पारंगत ब्राह्मण सामवेदाचे गान करीत होते व राजाज्ञेनुसार त्याचे सेवक अंग पुसण्याची वस्त्रे घेऊन राजासन्निध येत होते. एका पंचाने राजाने आपल्या अंगावरील पाणी साफ पुसून काढले व दुसरे तलम (नाजूक) वस्त्र आपल्या उत्तमांगावर चढविले. ही उंची वस्त्रे परिधान केल्यावर तो कुबेरासमान तळपू लागला. मी तेव्हा त्याला म्हणालो:– "हे राजा, डोळे उघडे ठेवून त्या शिजलेल्या अन्नराशीकडे नजर टाक. ते अन्न पर्वताला अर्पण कर. ह्या अन्नराशीपासून येथील देवता संतुष्ट होऊ देत. ते अन्न बळीचा मंत्र म्हणून पर्वताला अर्पण केले. तेव्हा रायरी पर्वत संतुष्ट झाला.

" अंगभर अलंकार विभूषित, हाताची बोटे हिरे-माणकांच्या अंगठ्यानी मढविलेल्या व गळ्यात मोत्याचा कंठा व दंडाभोवती कंकण घातलेल्या शिवरायाला विद्यादेवी मी अर्पण केली. तिच्या केशकलापाच्या भागात शेंदूर घातलेला होता. तिचे डोळे कमळाप्रमाणे वळलेले दिसत होते. तिचे विस्तीर्ण गाल वरखाली होत असलेले भासत होते. तिच्या कानातल्या बाळ्या दोलायमान भासत होत्या. दोन मोत्यांच्या कोंदणात बसविलेल्या रत्नामुळे ती तकाकत होती. भरदार नथीमुळे नाकाचा भाग अतिशय शोभायमान व खुलून दिसत होता. तिच्या अधरोष्ठ सौंदर्याच्या दृष्टीने बिंब फळाची सरशी केलेला वाटत होता. तिचा मुखचंद्रमा स्मिताने विलसत होता. तिची मान शंखाकृतीसारखी दिसत होती. तिचे वक्षस्थळ गुबगुबीत होते. मोत्याच्या कंठाने ती तळपत होती. कापरासारख्या शुभ्र वस्त्राच्या घेरामुळे तिच्या वक्षस्थळावर झगझगाट झाला होता. तिच्या अंगावर बांगड्या, काकणे, व आंगठ्या होत्या. तिच्या शरीराच्या मध्यभागावर केसांची वेलीसारखी ओळ होती. व त्यावर वक्षभाग हालत होता. डौलदार हत्तीच्या सोंडेबरोबर स्पर्धा करीत असलेल्या मांड्यामुळे ती सुरेख दिसत होती. भक्तकामना पूर्ण करणारा, शांत व प्रकाशदाता, मंत्र तंत्र विद्येत अग्रगण्य, त्रैलोक्यजेता, संसारी जनाला परिचित त्रिपुटीपूर्णता अशा शिवाचे उत्थापन होताच तिच्या पायातील पैंजणांचा रुमझुमाट होई, त्रिलोकावर अधिकार गाजविणारी, सौंदर्यास्तव अपूर्वरूपा म्हणून ओळखली जाणारी व नऊ देवदूतांचे रूप धारण केलेली अशी ती होती. केवळ मंत्रोच्चार ऐकताच महाराज खूष झाले. मलासुद्धा आनंद झाला व मी त्या राजराजेश्वराला म्हणालो, ' भोजन उरकून लवकर ये.' त्यावर राजा गृहाप्रत गेला.

गोविंदाने विचारले, " ती तीन आज्ञाक्षरे कोणती ? त्यांचा विनियोग कसा करायवाचा ? हे साधुश्रेष्ठा हे मी ऐकावयास उत्सुक आहे. तेव्हा कृपा करून मला ते सांगण्याची विनंती करतो. "

निश्चल उवाच : जनसंमर्दाचा लोट पाहिल्यावर महाराजांना हर्ष झाला व ते अंतःपुरात प्रविष्ट झाले. आपल्या आवडीचे रुचकर व संतोषकारक अन्न सेवन करून प्रसन्न अंतःकरणाने ते राजदरबारात आले. तेव्हा शिवरायाचे दर्शन होताच प्रजा प्रमुदित झाली. भाटांनी त्यांच्यावर विजयोत्सुक वाणीने स्तुति-सुमने वाहिली. नर्तिका हर्षभरे बेहोष होत्सात्या नाचू लागल्या. वैदिक व तांत्रिक (शाक्त) ब्राह्मणांनी त्यांचे आशीर्वादयुक्त अभिनंदन केले.

"माझ्या मध्यस्थीने शिवरायाने राज्यपदारोहण केले. या समयी दहा महाविद्या व मंत्र ह्यानी प्रजापालनाचे कार्य केले. "राज्यपदावर आरूढ झालेले महाराज म्हणजे जणू काय मूर्तिमंत मंत्रच होत. पूर्वी केव्हाही लोकांच्या अवलोकनात न आलेला चमत्कार त्या क्षणाला दृग्गोचर झाला व तो म्हणजे एक तेजोवलय चमकले हे होय. हा सारा महासरस्वतीचा प्रभाव होय. राजाच्या मनगटावर शक्तींनी कौतुक मंगल (पट्टा) बांधला असून आपल्या हातात त्याचे पदर धरले होते. त्यामुळे महाराज म्हणजे प्रतिब्रह्माच



अनुक्रमणिका






भासत होते. त्यांच्या डोक्यावर मौल्यवान भूषणांनी श्रृंगारलेले राजछत्र सूर्यचंद्राहूनही देदीप्यमान दिसत होते.

निश्चलाचा हा वाक्‌प्रवाह ऐकून गोविंदाला परम हर्ष झाला. त्यानी फिरून प्रश्न केला की चंद्र व सूर्य त्यांचे तेज एकाच वेळी व एकाच समयी कसे राहू शकले ?

निश्चल म्हणाला : त्याच्या डोक्यावरील छत्र हे विस्तीर्ण होते. ते त्यांच्या सार्वभौमत्वाचे तेजस्वी गमक होते. त्यांच्या स्नेही सुहृदाना ते चंद्रासारखे शीतल वाटले. कारण त्यांच्या दर्शनाने त्याना सुख झाले आणि शत्रूंना ते सूर्यासम भासले, कारण सूर्य-तापजन्य वातावरणामुळे शत्रूंचा थरकाप होई.

नंतर हातात तलवार धारण केलेले व त्यामुळे भव्य दिसलेल्या सर्व योद्धयानी त्याचे अभिवादन केले. रत्नजडित सुवर्णस्तंभ, मौक्तिकमाला, व वस्त्रांच्या मोठमोठ्या पताका ह्यामुळे दरबार शोभिवंत दिसत होता. पांडवांनी बांधलेला मायावी दरबार ब्रह्मा यानी खास शिवरायासाठी बांधला काय? ( असाच कोणी हा दरबारी थाट पाहून प्रश्न केला असता. )

इतक्यात हे विप्रा, ज्या ज्या भूपतींनी राज्याभिषेकाचे वृत्त ऐकले त्यांची जणू काय वज्रधातच झाल्यासारखी अवस्था झाली. शिवरायाच्या शौर्याचा प्रताप इतका दारुण होता की शत्रूच्या अंतःकरणास धसका बसून मेरुपर्वतापर्यंतच्या सर्व प्रदेशातील राजे होरपळून निघाले. शिवरायाच्या राज्याला धोका राहिला नाही. व सेना हर्षित झाली. राजाच्या शौर्यामुळे शत्रुसेना भयभीत झाली. सज्जनाचा व सत्याचा कैवारी झाल्यामुळे तो छत्रसिंहासनाधिपति झाला.

त्याचा बलशाही पुत्र रामराज ( राजाराम ) यवनांचे निर्मूलन करून सम्राट होईल. आपल्या बळाच्या जोरावर ब्राह्मणासाठी तो पृथ्वीचे रक्षण करील.

राजलक्ष्मी ही शिवरायाच्या कुळात तीनशे वर्षे वास करील. तोपर्यंत आरक्त मुख व ब्रह्मद्वेष्टचा यवनांचा शिवशक्ति निःसंशय बिमोड करील.

येणेप्रमाणे शिवराज्याभिषेकसमारंभाचे वर्णन साधुवर्य निश्चलपुरी व गोविंदा यांच्यात झालेल्या प्रश्नोत्तररूपी संवादाच्या आधारे अनिरुद्ध सरस्वतीने केले आहे.

'कल्पतरू' प्रबंधाची ही अष्टम शाखा असून ती तेजवान, थोर, शिवरायाच्या राज्याभिषेकाचे निरूपणात्मक एक पल्लव आहे. हे निरूपण नारायण भट्टसूत विद्याभूषण गोविंदा पंडिताच्या मुखकमल निवासी अनिरुद्ध वाग्देवीचा प्रसाद आहे.

नमस्ते. शालिवाहन शके १५९६ आनंदनाम संवत्सर, आश्विन शुद्ध ( ललिता ) पंचमी, बुधवारी अनुराधा नक्षत्रावर, आयुष्मान योगसमयी कुंभलग्नी झालेल्या शिवराय राज्याभिषेक विधीचे वर्णन आठव्या शाखेत समाप्त होते. कल्याणमस्तु.



अनुक्रमणिका






श्री. प्रभाकर पुजारी

# दिव्यदाहकाचे तपस्वी

'The great poet interprets to him his present or reinterprets for him his past, but can also point him to his future and in all three reveals to him the face of the eternal.''

– Sri. Aurobindo.

## अग्निमय प्राणतत्त्वाचा विकास

भारताच्या वैचारिक, भावनात्मक आणि कृतिशील जीवनात प्रचंड चैतन्ययुक्त आंदोलने निर्माण करणारे स्वा. सावरकर हे खऱ्या अर्थाने एकाकीच राहिलेले आहेत. सर्वच महापुरुषांच्या वाट्याला येणारे हे एक सनातन विधिलिखित आहे. सावरकरांच्या व्यक्तित्वातील विविध आणि जगाच्या दृष्टीने परस्पर–विरोधी असणाऱ्या प्रवृत्तींमुळे संपूर्ण सावरकर कित्येकांना मानवले नाहीत आणि झेपलेही नाहीत. त्यांच्या साथ उत्तुंग गरुडभरारी मारणे पुष्कळांच्या शक्तीबाहेरचे होते. प्रत्येक महापुरुषाच्या व्यक्तित्वाची मूस स्वतंत्र आणि स्वयंपूर्ण असते. त्यांच्या सामर्थ्याचे मोजमाप करायला जगाची रूढ ढोकळेबाज प्रमाणे अतिशय तोकडी पडतात. धैर्य, निष्ठा, कर्तृत्व, कवित्व यांविषयीचे सगळे सरधोपट आडाखे आणि निर्जीव सांगाडे तोडून फेकून द्यावे लागतात. त्या महापुरुषाच्या तेजात न्हाऊन निघणे व त्याच्या भारून टाकणाऱ्या वैखरीतून स्फूर्ती मिळवणे एवढेच फक्त जगाच्या हाती असते; किंवा खरे सांगायचे तर ही अटळ नियतीच ठरून जाते. जगाच्या जड रहाटीतून असली तेजस्वी शक्ती निर्माण होत नसते. ''न प्रभातरलं ज्योतिरुदेति वसुधातलात् । '' हे कालिदासाच्या प्रतिभेने हेरलेले चिरंतन सत्य ! सावरकरांचे व्यक्तिमत्त्व जड मातीशी नाते सांगत नाही; तरल अग्नितत्त्व हे त्यांच्या व्यक्तित्वाचे प्राणतत्त्व आहे. म्हणूनच प्रतिकूल परिस्थितीच्या प्रचंड दबावानेही ते अधोमुख बनले नाही, राखेत मिळवू पाहणाऱ्या मृत्युदंडाला लगटलेले असतानाही ते सतत दिव्य उज्ज्वल ध्येयाच्या दिशेने वरच उफाळत राहिले, संकटांच्या संतत धारेने ते अधिकाधिक प्रज्वलित होत गेले, एकाकीपणाच्या व दीर्घविरहाच्या दाहकतेत ते दग्ध होऊ शकले नाही, इतकेच नव्हे तर पन्नास वर्षांच्या शिक्षेमुळे सभोवती साकळलेल्या विराट विश्वव्यापी नैराश्याच्या काळोखाचा ते सहजपणे भेद करू शकले. सावरकरांच्या व्यक्तित्वातील अग्नितत्त्वाने लोखंडी बेड्या वितळवून टाकल्या. कारावासाने त्यांची तेजस्विता नष्ट झाली नाही. उलट ते कारागृहच त्यांच्या तेजाने उजळून निघाले, प्रभावित झाले. प्रियजनांच्या सावरकरांविषयीच्या दुःखाश्रूंनी किंवा सावरकरांच्या इतरांविषयीच्या विरहात्म अश्रूंनीही त्यांच्यामधले अग्नितत्त्व विझले नाही. पाशवी मनोवृत्तींचे खडक भेदून त्यांच्या ठिकऱ्या उडवण्याचे सामर्थ्य ज्या अश्रूत आहे ते अश्रू सावरकरांच्या दाहक व्यक्तित्वात आटून गेले. त्यांच्या व्यक्तित्वातील अग्निमय प्राणतत्त्व असे अविचल आहे, सर्वभक्षक आहे, उग्रनिष्ठ आहे. सावरकरांनी अखंडपणे दिव्यदाहकाचीच तपश्चर्या आचरलेली आहे. '' जे दिव्य दाहक म्हणूनि असावयाचे । बुध्याचि वाण धरिले करि हे सतीचे ॥ '' या एकाच श्लोकातून त्यांच्या जीवनाचे सारे रामायण उद्भवलेले आहे. सतीसारखा अग्निप्रवेश हे त्यांचे जीवनभरचे व्रत ! बालपणीच भावनावेगात उच्चारलेल्या स्वातंत्र्याविषयीच्या प्रतिज्ञाठिणगीचा वडवानल बनणे हे त्यांच्या जीवनाचे सतत होत गेलेले विकसन ! स्वातंत्र्याची यज्ञवेदी ही त्यांची कर्मभूमी ! आणि शस्त्रे उगारलेली अष्टभुजा महिषासुरमर्दिनी कुलस्वामिनी हे त्यांचे उग्र रुधिरप्रिय दैवत !

## संपन्न व्यक्तित्वाचा छंदरूप अवतार

या उग्र तपश्चर्येतून जे जीवन उजळून निघाले ते एक महाकाव्य ठरले. सावरकरांच्या जिवंत अनुभूतीतून जे शब्द बाहेर पडले ते कवितारूप बनूनच. कवीच्या आत्मिक शक्तीतून शब्दांना सामर्थ्य लाभते. कवीची



अनुक्रमणिका








निष्ठा, त्याचे आत्मबल, त्याच्या प्रबल भावना जेव्हा शब्दातून प्रकट होऊ पाहतात तेव्हा त्या शब्दांना श्रेष्ठ कवित्व बहाल केले जाते. असामान्यत्व आणि कवित्व यामधील सहोदरत्वाचे नाते फार जुने आहे. भारतीय परंपरेत तपोनिष्ठ ऋषी हेच मंत्रद्रष्टे महाकवी ठरलेले आहेत. जीवनातील दिव्यत्व आणि उदात्तत्व त्यांनी कवित्वशक्तीच्या बळावरच प्रकट केले. जीवनातील कोणत्याही श्रेष्ठ, जिवंत आणि उत्कट अनुभूतीला व्यक्त होताना काव्यरूपच धारण करावे लागते. वेद, उपनिषदे, गीता यामध्ये काव्य, तत्त्वज्ञान, धर्मस्वरूप या सार्‍या गोष्टी एकजीव झालेल्या आहेत. त्यांत अंतःप्रेरित विचार काव्यात्म बनलेला आढळतो. अत्यंत तरल संवेदनाशक्ती, जीवनातील संपन्नतेकडे आत्मीयतेने झेप घेणाऱ्या मनोवृत्ती, अंतःप्रेरणेचे नेतृत्व स्वीकारून विश्वाला वेढू पाहणारी प्रखर प्रज्ञा यांच्या एकात्मतेतून जे कवित्व प्राचीन भारतीयांनी निर्माण केले त्यातून चिरंतनाचे दर्शन जगाला घडले. त्याच भारतीय परंपरेतले सावरकर हे एक महाकवी आहेत. तीव्र भावना, प्रखर निष्ठा, उज्वल धर्मप्रेरणा, असीम बुद्धिनिष्ठा यांच्या एकजीव रसायनातून त्यांचे अनुभवविश्व आणि कविताविश्व ही निर्माण झालेली आहेत. त्यांच्या कवितेतील विचार उत्कट भावनेने रसरसलेला आहे आणि अनुभूतीच्या गर्भात पोसलेला आहे. सावरकरांच्या कवितेच्या धमन्यातून त्यांची निष्ठा सतत चैतन्याचा आविष्कार करताना दिसते. त्या कवितेच्या हृदयात त्यांच्याच ध्येयाची स्पंदने जाणवतात. त्यांची कविता एकाचवेळी अनुभवाची संवेदनात्मक, भावनात्मक आणि तेजोगर्भ स्वरूपे दाखवू शकते. सावरकरांचे सगळे जीवन म्हणजे दिव्यदाहकाची उग्र कठोर तपश्चर्या आणि त्यांची कविता म्हणजे त्यांच्या संपन्न व्यक्तित्वाचा छंदरूप अवतार ! कवीचा शब्द जितका त्यांच्या अंतःकरणातल्या खोल गाभ्यातून निनादत बाहेर पडतो तितका तो अधिक विश्व व्यापतो आणि तितकी त्याची कविता श्रेष्ठत्वाची उंच पातळी गाठते. कवितेतला लयात्म शब्द हेच वैखरीचे सर्वश्रेष्ठ स्वरूप असल्यामुळे तेच आत्मदर्शन आणि विश्वदर्शनही समर्थपणे घडवू शकते.

"It is noticeable that even the highest experience, when it does try to express things, tends instinctively to use often the rhythemic forms, almost always the manner of speech characteristic of poetry. But poetry attempts to extend this manner of vision and utterance to all experience, even the most objective ..." या श्री. अरविंदांच्या वचनाच्या प्रकाशातच सावरकरांसारख्या असामान्य व्यक्तित्व आणि लोकोत्तर जीवन लाभलेल्या व्यक्तीच्या कवित्वशक्तीचा साक्षात्कार घडू शकेल. सावरकर वृत्तीने कवी आहेत म्हणूनच त्यांच्या कवित्वशक्तीने जी दिव्य स्वप्ने रेखली, जी उग्र व्रते प्रबल ऊर्मीसरशी किशोरावस्थेत अंगीकारली, भारताच्या वैभवशाली इतिहासातील धीरोदात्त आत्मबलिदानाचे जे विराट दर्शन घेतले त्यांच्या मागोमाग त्यांचे जीवन ठेचाळत, रक्तबंबाळ होत सतत धावत राहिले. भारताच्या उज्ज्वल इतिहासाच्या स्फूर्तीतून त्यांच्या मनाची ठेवण आणि जीवनाची घडण बनली. त्या जीवनातील संपन्न उत्कट अनुभवातून त्यांची कविता उमलली. सावरकरांच्या कवितेत त्यांच्या अनुभवांबरोबरच त्यांच्या आत्मबलाचे, त्यांच्या निष्ठेचे, जीवनाला प्रेरणा देणाऱ्या श्रेष्ठ भारतीय मूल्यांचे आणि संस्कृतीचेही दर्शन घडते.

## आत्मसमर्पणाची धैर्यशाली भावना

कविप्रतिभेच्या सामर्थ्यावरच भारतीय इतिहासातील तेजस्वी व पराक्रमी व्यक्तींच्या जीवनाशी सावरकर पूर्णपणे समरस झाले. त्या तेजाने त्यानी आत्मज्योत पाजळली. रामायण–महाभारतालील पराक्रमी पुरुषांच्या जीवनाची गाथा वाचताना अगदी बाल्यवयातही ते थरारून जात असत. इलियडमधील पराक्रमाची वर्णने वाचताना ते बेभान बनत. छत्रपतींची बखर, पेशव्यांची बखर, विष्णुशास्त्र्यांची निबंधमाला यांची अगणित पारायणे त्यांनी केलेली होती. 'केसरी' व 'काळ' यांनी त्यांची तेजस्विता अधिक दाहक बनवली. चाफेकर–रानड्यांच्या खटल्याची, शिक्षेची व फाशीची वर्णने वाचताना वर्तमानपत्रांचे अंक त्यांच्या अश्रूंनी भिजत इतके त्यांचे अंतःकरण आत्मबलिदान करणाऱ्या व्यक्तीशी समरस होत असे. सावरकरांच्या ज्ञानावर,










भाषेवर, संस्कृतीवर आणि उत्साहावर ' काळा'च्या अखंड परिशीलनाचा फारच मोठा परिणाम झाल्याचे त्यांनी लिहून ठेवलेले आहे. ' काळ ' कर्ते हेच त्यांच्या क्रांतिकारक जीवनयज्ञाचे अध्वर्यू ! अंतःकरणातल्या या जिवंत स्फूर्तीप्रमाणेच शस्त्र हेही एक त्यांचे पूज्य दैवत होते. त्यांच्या घरातील जुन्या तलवारींचे कित्येक वेळा ते अतृप्त नजरेने दर्शन घेत. शस्त्रे उगारलेल्या उग्र रुधिरप्रिय कुलस्वामिनीवर त्यांची लहानपणी पराकाष्ठेची भक्ती होती. एखाद्या निष्ठावंत साधकाप्रमाणे ते त्या मूर्तीची तन्मयतेने आराधना करीत. " या देवी सर्वभूतेषु बुद्धिरूपेण संस्थिता । नमस्तस्यै नमस्तस्यै नमस्तस्यै नमोनमः ॥ या देवी सर्वभूतेषु शक्तिरूपेण संस्थिता । नमस्तस्यै नमस्तस्यै नमस्तस्यै नमोनमः ॥ " असे देवीस्तोत्र वडिलांच्या तोंडून ऐकताना ते मंत्रमुग्ध होऊन समाधिस्थासारखे भान हरपून बसत असत. बालवयात ज्या महिषासुरमर्दिनीने सावरकरांना चेतवले तिनेच पुढे त्यांच्यासमोर स्वातंत्र्यलक्ष्मीचे रूप धारण केले. म्हणूनच स्वातंत्र्यलक्ष्मीची आराधना म्हणजे सशस्त्र क्रांती असे त्यांच्या क्रांतिजीवनाचे सूत्र बनले. त्यांच्या क्रांतिजीवनाला आणि कविताविश्वाला ते तत्त्व व्यापून राहिलेले आहे. भारताचा पराक्रमपूर्ण इतिहास, देशाधर्मासाठी आत्मबलिदान करणाऱ्यांची स्फूर्तिदायक जीवन-मरणे, रुधिरप्रिय देवीची उपासना या सर्वांनी एकाच बिंदूकडे त्याना खेचत नेले. " चाफेकर-रानडे यांच्या प्राणज्योतीने जाता जाता चेतवलेली ही शत्रुंजय वृत्ती यज्ञकुंडात समिधेमागून समिधा टाकीत अशीच भडकावीत नेणे असेल तर त्याचे दायित्व माझ्यापुरते मजवरही पडत नाही का ? चाफेकरांचे कार्य कुणीतरी चालवले पाहिजे ना ? तर मग ते मीच का चालवू नये ? तो होम मीही का करू नये ! ! " अशा निर्णयापाशी क्रांतिजीवनाच्या अगदी सुरुवातीलाच सावरकर येऊन ठेपले. ते आता दिव्यदाहकाच्या तपोभूमीवर उभे ठाकलेले आहेत. " मी माझ्या देशाचे स्वातंत्र्य मिळवण्यासाठी सशस्त्र क्रांतीचा केतू उभारून मारिता मारिता मरेतो झुंजेन ! " अशी देवीपुढे शपथ घेऊन आपल्या उग्र तपश्चर्येला त्यानी सुरुवात केली. हे नुसत्या क्षणिक आंधळ्या भावनेतून निर्माण झाले नाही.

की घेतले व्रत न हे अम्हि अंधतेने
लब्धप्रकाश इतिहास-निसर्ग-माने

-असा त्या भावनेमागे इतिहासाचा आधार आहे. त्यामागे हुतात्म्यांची प्रेरणा आहे, प्रभावी आत्मबल आहे, सशस्त्र क्रांतीवरचा उदंड विश्वास आहे, " ती प्रतिज्ञा, ते व्रत मी तरी आजन्म आमरण आचरणार ! " असा तपोनिष्ठाचा दृढ निग्रह आहे. तुकारामांना जेथे देखे तेथे विठ्ठलाचीच पावले दिसली. या तेजस्वी निग्रही तपस्व्याला देखील " ते स्वदेशस्वातंत्र्य हेच आमचे ध्येय. ते स्वदेशस्वातंत्र्य हाच आमचा राजकीय धर्म. ते स्वदेशस्वातंत्र्य हीच आमची राष्ट्रीय देवता. आमचा राजकीय देव; आमची ऐहिक उन्नती; आमचा मोक्ष ! " असे स्वातंत्र्यब्रह्मच सगळ्या विश्वाला व्यापून राहिल्याचा साक्षात्कार झाला. सावरकरांच्या जीवनाचा आणि कविताविश्वाचा विस्तार याच स्वातंत्र्यब्रह्माच्या स्फुरणातून झालेला आहे.

सावरकरांच्या वैयक्तिक जीवनाने आपल्या उषःकालीच हिंदुराष्ट्रजीवनात सायुज्यता मिळवली. भारतीयत्वाचेच चैतन्य त्यात सदैव सळसळले. त्यांच्या कवितेतील उत्कट वैयक्तिक भावनेतही हिंदूच्या इतिहासातील हुतात्म्यांच्या आत्म्यांचे स्पंदन ऐकू येते. त्यांच्या कवितेतील विचारसंपदेमागे प्राचीन भारतीय ग्रंथांची आणि महाकाव्यांची प्रेरणा आहे. त्यांच्या प्रतिभेचा स्पर्श झाल्याबरोबर भारतीय इतिहास चैतन्याने थरथरू लागला आणि त्याच्या गर्जनेने क्रांतिकारकांचे जग दुमदुमून गेले. बलशाली जिवंत इतिहास, आत्मबलिदानाची प्रेरणा, हिंदुराष्ट्राच्या उज्ज्वल भविष्याची भव्य स्वप्ने, शस्त्रावरची अपार निष्ठा, शत्रुंजय निर्धार, स्वातंत्र्यलक्ष्मीची उग्रदाहक तपश्चर्या हे सारे प्रवाह एकवटून त्यांच्या कवितेचा प्रचंड महानद महाराष्ट्राच्या सारस्वतसागरात विलीन झालेला आहे. जिवंत इतिहासाने प्रज्वलित केलेली आत्मसमर्पणाची धैर्यशाली भावना हा सावरकरांच्या कवितेचा आत्मा !

तानाजिचा समरधीर तसा पवाडा
गावा चितोरगड वा शनिवारवाडा
... ... ... ... ...
" बाजीप्रभू ठरु " वदे युवसंघ सर्व
" आम्ही चितोरयुवती " युवती सगर्व







अशी आत्मसमर्पणाची भावना इतिहासाने चेतवलेली आहे. लहानपणापासून सावरकर आणि त्यांच्या भोवतालचे मित्रमंडळ यांनी विशिष्ट प्रवृत्ती जोपासलेल्या आहेत. तानाजी, बाजीप्रभू, चितोडयुवती ही त्यांची श्रद्धास्थाने ! या साऱ्यांच्या अंतःकरणात आत्मसमर्पणाचा स्फुल्लिंग आहे. सावरकरांनी तोच आपल्या अंतःकरणातही जागवला. भारतीय इतिहासातील बलिदाने ही त्यांच्या कवितेची अविभाज्य अंगे आहेत. यशपूर्ण विजयापेक्षाही पराभूत पण झुंजार बलिदानाकडे तिच्या अंतरात्म्याची ओढ अधिक आहे. सावरकरांच्या रक्तातील भारतीयत्व हेही त्यांच्या कवितेपासून अलग करता येत नाही. त्यांच्या कवितेतील आत्मसमर्पणाची भावना ही प्राचीन भारतीयांच्या यज्ञकल्पनेशी समरस झालेली आहे. स्वातंत्र्यासाठी यज्ञकुंड धडाडलेले आहे, हुताशन जाज्वल्य बनलेला आहे, ज्यांनी उग्र दीक्षा घेतलेली आहे त्यांची परीक्षा पाहण्यासाठी ' बोला असे कवण भक्ष्य हुताशनाला ? ' असे आवाहन ईश्वराने केलेले आहे आणि त्यावेळी

दिव्यार्थ, देव । अमुचे कुल सज्ज आहे
हे साध्वि, गर्जुनि असे पहिल्या हवीचा
हा ईश्वरी मिळविला अम्हि मान साचा

— अशा शब्दांच्या ठिणग्या सावरकरांच्या अग्निमय व्यक्तित्वातून बाहेर पडल्या. लहानपणी अनवधानाने घरात बसून 'आरण्यके' वाचणाऱ्या या कवीच्या घराचे भविष्यकाळात खरेखुरे अरण्य बनले. सावरकरांच्या तेजाळ व्यक्तित्वाने साऱ्या कुटुंबियांच्या अंतःकरणातील वन्ही फुलवला. सारे सावरकरकुल प्राणाची बाजी लावून स्वातंत्र्यलढ्यासाठी सिद्ध झाले. सावरकरांशी नात्याने जखडलेले त्यांच्या भोवतालचे सगळे चराचर विश्व आहुतीसाठी आत्मीयतेने सज्ज झाले.

दीप्तानलात निजमातृविमोचनार्थ
हा स्वार्थ जाळुनि अम्ही ठरलो कृतार्थ !
त्वत्स्थंडिली ढकलिली गृहवित्तमत्ता
दावानलात वहिनी नवपुत्र कांता
त्वत्स्थंडिली अतुल–धैर्य वरिष्ठ बंधु
केला हवी परमकारुण पुण्यसिंधु
त्वत्स्थंडिलावरि बळी प्रिय बाळ झाला
त्वत्स्थंडिली बघ अता मम देह ठेला

हे काय बंधु असतो जरि सात आम्ही
त्वत्स्थंडिलीच असते दिधले बळी मी !

हे सावरकरांचे व्रत जितके दाहक आहे, सर्वभक्षक आहे तितकीच तपश्चर्याही उग्रकठोर आहे, मृत्युंजय आहे, कुलधर्माच्या रूपाने अवतरलेली आहे. साऱ्या सावरकर कुलाने आहुती दिलेली आहे. साऱ्यांच्या कुलधर्माने विशाल राष्ट्रधर्म स्वीकारलेला आहे. सावरकरांच्या व्यक्तित्वातील अग्नितत्त्वाने सतत यज्ञीय ज्वाळेकडे झेप घेतलेली आहे. यज्ञीय हुताशनाविषयीची ही आंतरिक ओढ त्यांच्या कित्येक कवितातून व्यक्त झालेली आहे. १९१० साली, फाशीची किंवा जन्मठेपेची शिक्षा होऊन त्यातच आपला अंत होणार अशा भावनेने त्यांनी आपल्या देशभक्त मित्रांबरोबर मातृभूमीकडे तिच्या ऋणाच्या फेडीचा 'पहिला हप्ता' धाडला. त्यातही ' ऋण ते फेडाया । हप्ता पहिला तप्त स्थंडिली देह अर्पितो हा ।। सवेचि जन्मुनिया । त्वन्मोचनहवनात हवी करु पुनःपुन्हा काया ।। ' अशी यज्ञीय आत्मसमर्पणाचीच भावना उफाळून प्रकट झालेली आहे. ही भावना भक्तिसुखासाठी गर्भवासाची मागणी करणाऱ्या तुकारामांच्या भावनेपेक्षा कोणत्याही अर्थाने कमी उत्कट नाही. ती त्याच तोलाची आणि मोलाची आहे. ठाण्याच्या कारागृहात धाकट्या भावाबरोबर बंदिस्त असताना, ' बाष्पयंत्रात प्रेरणा उत्पन्न होण्यासाठी आपल्या देहास इंधन करून जर कोणी जळत राहिलेच तर मात्र ते आपणच का राहू नये ? असले नुसते जळत राहणे हे कर्मच आहे, इतकेच नव्हे पण महत्कर्म आहे " असा सावरकरांनी त्याला धीराचा संदेश पाठवला. जळत राहणे हा सावरकरांचा कर्मयोग होता. अंदमानच्या कारागृहात निद्रेविषयीची कृतज्ञता व्यक्त करतानाही ध्येयमूर्ती चंडिकेला तृप्त करण्यासाठी आपण आपल्या हातांनी स्वतःची चिता रचून त्यात प्रवेश केल्याची ग्वाही ' निद्रे ! ' या कवितेत त्यांनी दिलेली आहे. " कोणत्या तरी अत्युच्च, अतिभव्य, अतिदिव्य ध्येयास त्याभोवती त्यागाची आणि पराक्रमाची जाज्वल्य प्रभावळ पेटवून ती लोकांच्या दृष्टीसमोर धरल्यावाचून लोकांची मने आकर्षण होणार नाहीत " हे वैचारिक अधिष्ठान त्यांच्या आत्मसमर्पणाच्या भावनेला लाभलेले आहे. जीवनातील कोणतेही तत्त्व






त्यापाठीमागे एखाद्या प्रभावी व्यक्तिमत्त्वाचे चैतन्यबल असल्याशिवाय जिवंत होऊ शकत नाही, कृतिशील बनू शकत नाही. ते एक शाश्वत सत्य आहे. त्याला अनुसरूनच आपल्या प्राणाची 'ठिणगी' राष्ट्राच्या असंतोषाच्या स्फोटक कोठारात फेकण्याचा कर्ममार्ग सावरकरांनी प्रथम आचरला. तेजाळ व्यक्तित्वाच्या या कवीला मातृभूमीच्या अश्रूतही अग्नीच्या ज्वाळा भडकल्याचा साक्षात्कार झाला.

बंदीमाजि तुवा छळांसि सहता जे ढाळिलेसी अहा
अश्रू घेउनि पेट तेचि उठती जाळू छळा त्या पहा.
बंदीगेहचि आतुनी भडकवी पाण्यातली आग ती
फाशीचे जळण्या, उडोनि ठिणग्या, ते खांबही लागती.
क्रोधाचा ज्वर जो भरे तुज, न तो साहोनि उत्ताप हा
बेड्यांची तव लागताति वितळू आगीत अंती पहा.
जो जो पुष्टविशील आग असली अश्रूसि ढाळूनिया
तो तो टाकिल ती छळासि छळकासंगेचि जाळूनिया.

मातृभूमीच्या गुलामगिरीतून उद्भवलेली क्रांतीची ज्वाला त्या गुलामगिरीलाच भस्मसात करून टाकील असा त्याना पुरेपूर विश्वास आहे. सावरकरांचे कर्म, त्यांची आकांक्षा, त्यांचे बलिदान, त्यांचे विचार या साऱ्यांना अग्नीची विलक्षण ओढ आहे. आणि ते स्वाभाविकच आहे, कारण त्या साऱ्यांचा उद्भव त्यांच्या तेजस्वी व्यक्तित्वातून आहे. खडतर कारावासात एक तप काढल्यानंतर देहाच्या विकल अवस्थेत 'मरणोन्मुख शय्येवर' ही कविता त्यानी लिहिली. रुग्णजर्जर देहाचा पोत मृत्यूने खाली वळवत नेलेला असतानाही आत्म्याची ज्वाला अंतराळ कवळण्यासाठी वर उफाळत आहे. रणयज्ञाग्नीत आहुती दिल्यानंतर इंधनाप्रमाणे अस्थी, मांस जळत जळत फक्त यौवनाची राख तेवढी शिल्लक राहिलेली आहे, पण जीवनाचा दिवस उग्र तपश्चर्येसाठी कारणी लावलेला असल्यामुळे 'दिवसास्ताचेही म्हणुनि दुःख ना मला' अशी कर्तव्यनिष्ठेची साफल्यभावना सावरकरांनी त्या कवितेत व्यक्त केलेली आहे. विश्वाच्या तेजात जर प्राणाची ज्योत मिळून जाणार असेल तर, 'तरि मरणा! मरण न तू! मरण मुक्तिची' असे हे मृत्युंजय तेजोगर्भ आत्मबल आहे. 'धगधगीत पुण्यराशी। माहापुरुष ॥' या समर्थांच्या वचनात असामान्यांच्या तेजस्वी व्यक्तिमत्त्वाचाच निर्वाळा आहे.

## भावविश्व आणि कर्तृत्वविश्वाची एकरूपता

देशभक्ती आणि कविप्रतिभा या सावरकरांच्या अंतःकरणातील जुळ्या भावना एकमेकींना कधीही विसंबलेल्या नाहीत. सावरकरांचे भावविश्व आणि कर्तृत्वविश्व ही दोन्ही एकरूप आहेत आणि त्यांचा लय राष्ट्रजीवनात झालेला आहे. असीम देशभक्ती हे त्या सर्वांचे प्राणतत्व आहे. उत्कट आणि परस्परविरोधी भावनांच्या कल्लोळातही याच प्राणतत्त्वाचे अस्तित्व सदैव जाणवत राहते. त्यांच्या कवितेतील, पराकाष्ठेच्या नैराश्यापासून मृत्युंजय आवेशापर्यंतच्या प्रत्येक भावस्थितीच्या अंतर्यामी राष्ट्रनिष्ठेची ज्योत सतत तेवत आहे. हे मूल्य तसे फार पुरातन आहे पण सावरकरांच्या कृतिशील आत्मसमर्पणाच्या झळाळीमुळे त्यांच्या कवितेत त्याला नव्याने संजीवनी लाभलेली आहे. भारतीय इतिहासाच्या स्फूर्तीचे सूत्र हे तर त्यांच्या सबंध कवितेतून गुंफलेले आहे. स्वातंत्र्यलक्ष्मी या आपल्या दैवताविषयी 'न मिळो खावया न वाढो संतान' असली तुकारामांसारखी दुर्दम्य अविचल निष्ठा सावरकरांनी जोपासली म्हणूनच त्या निष्ठेतून अंकुरलेली त्यांची कविता तुकारामांच्या अभंगाप्रमाणे सरळसरळ हृदयाला जाऊन भिडते. कवित्व, आत्मसमर्पण आणि स्वातंत्र्यभक्ती या तिहींच्या संयोगातून सावरकरांच्या कवितेचा मूळ ॐकारध्वनी निनादलेला आहे. त्यांच्या सगळ्या कवितांच्या मूलस्थानी ही तीन तत्त्वे आहेत, अगदी लहान वयातच गोदावरीच्या काठावर बसून–

सांप्रत सर्वचि झाले माते, हे भरतखंड हीन खरे
परवशता बहु दुःसह, बरवी हृदयस्थ नडगिची नखरे

–अशी तडफड त्यांनी व्यक्त केली. भावनेला कर्तृत्वाची जोड मिळण्यापूर्वी त्यांची कविता इतिहासाला प्राणाची फुंकर घालून जिवंत करताना दिसते. असा लेखकाच्या चैतन्याने भारलेला केवढी प्रचंड शक्ती निर्माण करू शकतो आणि किती असंख्य क्रांतिकारकांना जन्म देऊ शकतो ते '१८५७ चे स्वातंत्र्यसमर' या ग्रंथाने प्रत्यक्ष दाखवूनच दिलेले आहे. कित्येक निष्क्रिय, श्रद्धाहीन व विलासी तरुणांना त्या ग्रंथाने क्रांतिप्रवण बनवले. सावरकरांचे कवित्व भारतीय इतिहासाने स्फुरवले आणि त्यांनी कविप्रतिभेच्या बळावर जिवंत केलेल्या इतिहासाने त्यांचेच हृद्गत शब्दांकित








केले. प्रत्यक्ष क्रांतिकार्यात उडी घेण्यापूर्वी सावरकरांनी जो बाजीप्रभूचा पोवाडा लिहिला त्यात त्यांचे ध्येय आणि त्यांचे स्फूर्तिस्थान ही दोन्ही प्रकट झालेली आहेत :

स्वराज्य नाही स्वदेश नाही धिक् त्या देहाला
... ... ... ... ...
तुम्हीच ना स्वातंत्र्य चिरियले या पोटासाठी !
तुम्हीच ना रे भूमातेच्या नख दिधले कंठी !
... ... ... ... ..
साप विखारी देशजननिचा ये घ्याया चावा
अवचित गाठुनि ठकवुनि भुलवुनि कसाहि ठेचावा.

ह्या बाण्याच्या आधि संगरी जरि घडता मरणे
पुनर्जन्म तत्क्षणी घेउनी पुनःपुन्हा लढणे
... ... ... ... ...

या बाजीप्रभूच्या एकाच पोवाड्यात इतिहासातील जिवंत प्रेरणा, वर्तमानाचे भेदक दर्शन, भविष्यकालातील कार्याची स्फूर्ती, अंतरात्म्याची एकमेव निष्ठा या साऱ्यांचा आविष्कार करून शेवटी ' श्रीबाजीचे रक्त पेरिले खिंडित त्या काला । म्हणुनि रायगडि स्वातंत्र्याचा थोर वृक्ष झाला ॥ ' अशी त्यावर आपल्या प्रतिभेने हेरलेल्या चिरंतन तत्त्वाची मोहोर सावरकरांनी ठोकलेली आहे. रामाने रावणाचा आणि विक्रमाने शकाचा जसा पराभव केला त्याप्रमाणेच पुष्यमित्राने यवनांचा आणि यशोधर्माने हूणांचा धुव्वा उडवला याची अभिमानास्पद नोंद त्यांच्या कवितेने केलेली आहे. ' हिंदूंचा सत्पक्ष घेउनी अहिंदु पिटिला जली स्थली ' असे ' गोमांतक ' खंडकाव्यातील विजयगीतही इतिहासाच्या प्रेरणेने भारलेले आहे. कवितालेखनाच्या शेवटच्या काळातली सावरकरांची कवितादेखील ' करित जै शिकंदर स्वारी । चंद्रगुप्त ग्रीका मारी ॥ हाणिले हुसकिता जेथे । हूणांसि विक्रमादित्ये ॥ अशी इतिहासाच्या स्फूर्तीची धार सतत अखंडपणे वाहत असल्याची साक्ष देते.

### आत्मसमर्पण आणि झुंज यांचा दुहेरी गोफ

सावरकरांच्या कवितेतील आत्मसमर्पण स्वातंत्र्यनिष्ठेच्या कुशीतून जन्मलेले आहे. ' सांत्वन ' या कवितेत सावरकरांनी आपल्या कुलधर्माचे स्वरूप स्पष्ट केलेले आहे. भारताची स्थिती मुमुक्षु गजेंद्रासारखी झालेली आहे. त्या गजेंद्राने सावरकरवंशकमल ईश्वराच्या पायी समर्पित केलेले आहे. त्यामुळे ते पावन झाले. भारताची सेवा करण्याचे भाग्य आपल्याला लाभले आणि आत्मबलिदानाचा मान आपल्या कुळाला लाभला याची सावरकरांना धन्यता वाटली. थोरल्या बंधूंना जन्मठेपेची शिक्षा झालेली असताना आणि सावरकर स्वतः त्याच मार्गावर असताना त्यांनी ही ' सांत्वन ' पर कविता आपल्या वहिनीला उद्देशून लिहिली आणि ती त्यांच्या आत्मसमर्पणाची नांदी ठरली. ' तुजसाठि मरण ते जनन । तुजविना जनन ते मरण ॥ ' असे क्रांतिवीराच्या आणि स्वातंत्र्यवीराच्या जीवन–मरणाचे स्वरूप पार वेगळे असते. शत्रूंच्या रक्ताने मातृभूमीला दारुण स्नान घालू किंवा तिच्या सन्मानरक्षणी प्राणांचे बलिदान करू असे कडोविकडीचे आश्वासन सावरकरांनी आपल्या मायभूमीला दिलेले आहे. ' मुक्त तिचे जीवन की तेच आमुचे ' अशी मातृभूमीशी एकरूपता त्यांनी साधलेली आहे. स्वातंत्र्यप्राप्तीसाठी सारे सावरकरकुल निर्वंश बनले तर देशभक्तांच्या अखंड परंपरेत त्याला स्थान मिळून ते अजरामर होईल अशी त्यांची श्रद्धा आहे :

या भारतभूस्तव समररंगणी गेले
या चिंतेने बहु वीर लढुनिया मेले
कुणि घोर यातनांचिया चितेवर जळले
कुणि फास गळ्यासी लागताहि ना ढळले

–त्या साऱ्यांविषयी सावरकरांना आत्मीयता वाटते. त्यांच्या कवितेतील स्वातंत्र्यनिष्ठा ही कडवेपणाने मरण–मारणाचा संग्राम करू इच्छिते.

सावरकरांच्या कवितेतील आत्मबलिदानाचा पिंड हा अनेक ध्येयनिष्ठांच्या आत्मबलिदानांपेक्षा फार वेगळा आहे. त्याला आत्मक्लेशाचा मार्ग मान्य नाही. त्या आत्मसमर्पणाच्या पोटी झुंजण्याची जिद्द आहे. सशस्त्र प्रतिकार हे त्यांच्या आत्मसमर्पणाच्या मुठीचे धारदार पाते आहे. सावरकरांच्याच शब्दात सांगायचे तर पाते हे मुठीच्याच आधारावर रणकंदनी लवलवते, पाते मुठीच्याच मनोगताचे पारणे फेडीत असते. सावरकरांच्या कवितेतील आत्मबलिदान शस्त्रजीवी आहे; प्रथम आहुती घेऊ पाहणारे आहे. असे आत्मसमर्पण








बाजीप्रभूंच्या जीवनात असल्यामुळे त्याचा पोवाडा सावरकरांनी आत्मीयतेने गाईलेला आहे. शत्रूंचा बळी प्रथम घेऊन आत्मबलिदान करणाऱ्या बाजीप्रभूसारखी त्यांची आत्मसमर्पणाची प्रकृती आहे. अंदमानातल्या भीषण कारावासात आत्महत्येच्या तीव्र भावनेने घेरले जात असताना त्यांच्या प्रवृत्तीने असे कुत्र्याच्या मोलाने मरायचे नाकारले. मरायचेच तर सैनिकाप्रमाणे शत्रूचे रक्त सांडूनच असा निर्धार शेवटी प्रबळ ठरला. त्यांच्या 'मूर्ति दुजी ती' कवितेतील बंदावीर हा धर्मासाठी प्राणत्याग करणारा धर्मवीर तर आहेच पण त्याहीपेक्षा विशेष म्हणजे शस्त्रांच्या सामर्थ्यावर पंजाबच्या हृदयातील परकीयांचे दास्यशल्य उपटून फेकून देणारा रणवीर आणि स्वातंत्र्यवीरही आहे. वधस्तंभाच्या परिसरात वावरण्याची वेळ जेव्हा सावरकरांवर आली तेव्हा त्याच्याच स्मरणाने सावरकरांना स्फूर्ती दिली. बंदावीराने जहाल छळ सहन केला आणि–

याहुनिही भयद असे छळ सहेनची
परि झटेन, जीवनांतिही झटेनची
करण्यासी ही विमुक्त मातृभू पुन्हा !
मुक्त पुन्हा, शक्त पुन्हा......

अशी झुंजण्याची प्रेरणा देणारी श्रद्धा त्यांच्या ठिकाणी निर्माण केली. आत्मसमर्पण आणि झुंज यांचा दुहेरी गोफ त्यांच्या कवितेत विणलेला आहे. 'मूर्ति दुजी ती' या कवितेत सावरकरांनी कवितादेवीच्या समरभीषण चंडमूर्तीलाच आवाहन केलेले आहे. तिच्या भैरवालाही भिवविणाऱ्या रणकर्कश गर्जनेसाठी त्यांचे मन नादावलेले आहे. रुधिरप्रिय, खड्गधारी, रुंडधरा-रौद्रभीषण अशी कवितादेवीची मूर्ती हीच खरी प्रत्यक्ष कर्तव्यमूर्ती आहे ही त्यांच्या मनाची धारणा आहे. त्यांच्या कवितेतील कर्तव्यनिष्ठा– आत्मसमर्पणनिष्ठा रुधिरप्रिय आहे. 'सायंघंटा' या कवितेतील त्यांची सहनशीलता मरणोन्मुख नाही, अगतिक नाही. ती जयिष्णुतेचा पिंड पोसणारी आहे. अंदमानाच्या कारावासातील एकेक दिवस त्यांना शत्रूच्या सैन्यातील एकेका सैनिकासारखा वाटतो.

मेला दिन-शत्रु एक : नष्ट दशेच्या
सेनेतिल दिवसांच्या एक शिपाई
पडला होऊनि ठार अधिक एक हा!

दिवस वधस्तंभावर चढवला की सायंघंटेचे टोल खणखणतात ही झुंजण्याची प्रेरणा कोणत्याही परिस्थितीत त्यांच्या कवितेला पाठमोरी झालेली नाही. ध्येयाशी एकरूप होऊ पाहणाऱ्या त्यांच्या आकांक्षेने प्राणपणाने झुंजणाऱ्या आणि विलक्षण तडफेने आकाशात झेप घेणाऱ्या गरुडकन्येचे रूप धारण केलेले आहे. 'हे नवे रक्त तो विजेहुनी पेटावे। मृत्यूसि तुम्ही गाठून बळे भेटावे ॥' असे हे झुंज आणि आत्मबलिदान यांचे अभेद्य साहचर्य आहे.

चाफेकरांच्या फाशीतून आपण जन्मलो आणि आपल्या फाशीतून आणखी कोणीतरी जन्मेल असे क्रांतिकारकाच्या आत्म्याचे अमरत्व सावरकरांनी प्रकट केलेले आहे. ते आत्मबल–

अनादि मी अनंत मी अवध्य मी भला
मारिल रिपु जगति असा कवण जन्मला
अग्नि जाळि मजसी ना खड्ग छेदितो
भिउनि मला भ्याड मृत्यु पळत सूटतो
आण तुझ्या तोफांना क्रूर सैन्य ते
यंत्र तंत्र शस्त्र अस्त्र आग ओकते
हलाहला। त्रिनेत्र तो
मी तुम्हासि तैसाची गिळुनि जिरवितो !

–अशा तऱ्हेचे आहे. ध्येय हा ध्येयवाद्याचा आत्मा असतो. ध्येयवाद्याच्या पार्थिव देहाचा नाश अन्यायी सत्तेला करता आला तरी ध्येय हे जगातील कोणत्याही पाशवी सत्तेला नष्ट करता येत नाही. ध्येयनिष्ठा अजिंक्यही असते आणि अमरही असते. अर्न्स्ट टोलर या प्रसिद्ध ज्यू लेखकाने तुरुंगातून आपल्या पत्नीला आणि मित्राना लिहिलेल्या पत्रातून ध्येयवाद्याच्या अजिंक्य आत्मबलाचे दर्शन घडवलेले आहे. "माझ्या शक्तीला शरण आणण्याचे सामर्थ्य तुरुंगाच्या भिंतीतच काय पण संगिनीत आणि तोफातही नाही......आज तुरुंगात असूनही मी स्वतंत्र आहे......ज्या ध्येयाकरिता क्रांतिकारकानी आपले रक्त सांडलेले असते ते कोणालाही तुरुंगाच्या भिंतीआड डांबून ठेवता येणार नाही. ते ध्येय स्वतंत्रच राहते. क्रांतिकारकाच्या रक्ताच्या थेंबाथेंबागणिक त्याचे सामर्थ्य वाढत असते' असे आपल्या रक्तातून वाहणारे तत्त्वज्ञान टोलरने पत्रात शब्दबद्ध केलेले आहे. सावरकरांच्या कवितेतील तत्त्वज्ञानही क्रांतिकारकाच्या रक्तातून उसळलेले आहे.








सावरकरांच्या ' गोमांतक ' या खंडकाव्यात त्यांची Life vision आढळते. त्यांचे जीवनविषयक तत्त्वज्ञान भारतीय संस्कृतीच्या सूक्ष्म अध्ययनातून आणि असीम जीवननिष्ठेतून निर्माण झालेले आहे. सूक्ष्म धर्मबुद्धी असलेल्या द्रष्ट्या ऋषींच्या तपःसामर्थ्यामुळेच भारत अनेक आघातांनीही जीवनशून्य होऊ शकला नाही अशी सावरकरांची दृढ श्रद्धा आहे. दुबळ्यांचे देवही दुबळेच असतात हे भेदक सत्य त्यांच्या ' गोमांतका'त मूर्तस्वरूप बनलेले आहे, त्या खंडकाव्यात सगळ्या भोंगळ अवास्तव तत्त्वांचा सावरकरांनी मर्मभेद केलेला आहे. उपयुक्ततावाद ही त्यांना क्रांतीची मनुस्मृती वाटते. त्यांच्या दृष्टीने श्रीकृष्ण हाच उपयुक्ततावादाचा पहिला प्रणेता आणि आचार्यही; कारण त्यानेच प्रथम तो आचरून दाखवला. व्यवहारनिष्ठा हे सावरकरांच्या जीवनविषयक तत्त्वज्ञानाचे अधिष्ठान आहे. ' निष्क्रिया भक्तिसी पावे देवही न गमे मला ... परी आत्मबला सीमा असे देहबलापरी ... दंडशक्तिविना तैसे क्षमादान विडंबना ... शांत भावचि हा, साधो, रिपुक्रौर्य न आपदा ... दुर्बलाची दशा ऐशी । स्मशान सगळी मही ... पंगु दुर्बल पुण्याई : जोवरी जगतात की । चरणी नखरे व्याघ्रा, गरले भुजगामुखी ॥ ... तुझे सद्‌गुणची भारी, भारता, तव घात ते ! ... धर्माविण बल पाशव हे जसे खरे । पंगु धर्मही तसा बलाविना ठरे ॥ ' अशी जीवनानुभवांच्या मंथनातून काढलेली जिवंत तत्त्वे ' गोमांतका'त विखुरलेली आहेत. प्रकृती ही व्याघ्रीसारखी क्रूर व प्रेमळ अशी उभयविधा आहे. जीवनातील या दोन्ही प्रवृत्तींचे योग्य पोषण केले तरच माणसाला प्रगती करता येणे शक्य आहे. ' भारतीय संस्कृतीने धर्माच्या पायाशी तलवारीची योजना केलेली आहे ' या विवेकानंदांच्या वचनात जीवनाचे द्विविध पण समतोल तत्त्वज्ञान स्पष्ट झालेले आहे. ' बळावाचून तत्त्व, शक्तीवाचून न्याय, प्रयत्नावाचून दैव, भौतिकावाचून आत्मिक, ऐहिकावाचून पारमार्थिक पंगू आहे, अपूर्ण आहे ' हे सावरकरांचे तत्त्वज्ञान त्यांच्या रक्तातून उसळलेले आहे बुद्धीतून तावूनसुलाखून निघालेले आहे, कर्तृत्वामधून जिवंत झालेले आहे आणि कवितेतून चिरंतन बनलेले आहे. ' Great poet reveals the face of the eternal '

---

## लेखकांना विनंति

(१) ' नवभारत ' मासिकासाठी पाठवावयाचे लेख कागदाच्या एकाच बाजूवर शाईने सुवाच्य लिहावे.

(२) लेखाची पोंच ताबडतोब देण्यात येऊन त्यासंबंधी निकाल सामान्यतः एक महिन्यात कळविण्यात येईल. न स्वीकारलेला लेख परत करण्यासाठी अवश्य तो टपालखर्च पाठवावा.

(३) लेखाची मर्यादा सामान्यतः ४००० शब्दांहून अधिक नसावी. अनेक अंकातून लेखांक देण्यापेक्षा विशिष्ट मुद्यावर स्वतंत्र लेख लिहिणे बरे.

(४) आशयाला बाध न आणता लेखाची मर्यादा कमी करण्याचा अधिकार संपादकमंडळाला राहील.

(५) लेखाबद्दल अल्पस्वल्प मोबदला देण्याचे संपादकमंडळाने ठरविले आहे.

(६) अभिप्रायासाठी पाठवावयाच्या पुस्तकांच्या दोन प्रती येणे लवकर अभिप्राय देण्याचे दृष्टीने सोयीचे पडते.

(७) लेख, संपादकासाठी इतर काही मजकूर व अभिप्रायासाठी पुस्तके कार्यकारी संपादकांचे पत्त्यावर मुंबईस पाठविणे.



अनुक्रमणिका






प्रा. पां. ना. कुलकर्णी

# शांतलिंगाप्पा आणि विवेकचिन्तामणि– काही विचार

'विवेकचिन्तामणी[१]' हा प्राचीन मराठीतील ग्रंथ कर्नाटक विश्वविद्यालय आणि पुणे विद्यापीठ यांचे पहिले संयुक्त प्रकाशन म्हणून प्रसिद्ध झाला आहे. त्याचे संपादन धारवाडच्या कर्नाटक महाविद्यालयातील मराठी विभागाचे प्रमुख प्राध्यापक डॉक्टर पंडित आवळीकर यानी केले आहे. डॉ. दा. चिं. पावटे आणि महामहोपाध्याय द. वा. पोतदार या दोन्ही कुलगुरूंचे अनुक्रमे 'Foreword' आणि 'पुरस्कार' लाभल्याने ग्रंथाचे भाग्य वाढले आहे. ९८ पृष्ठापर्यंत विस्तारलेली संपादकाची प्रस्तावना, सुमारे दहा पानांची विषयानुक्रमणिका, पान १ ते ३४१ त मूळ ग्रंथाची दहा परिच्छेदांची बरीच उत्तरकालीन वाटणारी संहिता, पान ३४२ ते ३७१ त वारदप्रतीच्या आधाराने नोंदलेले पहिल्या दोन परिच्छेदांचे पाठभेद, पान ३७२ ते ४३४ त टीपा आणि शेवटच्या दोन पानावर 'ग्रंथातील प्रक्षेप व संक्षेप' असे या ग्रंथाचे स्वरूप आहे.

या विद्यापीठ प्रकाशनापूर्वी विवेकचिन्तामणीचे पहिले दोन परिच्छेद सोलापूरच्या श्रीमान वारदांच्या आश्रयाखालील 'वीरशैवलिंगिब्राह्मणधर्मग्रंथमाले'तून ३५ वा ग्रंथ म्हणून शके १८३० मध्ये प्रसिद्ध झाले होते. त्यात प्रथम परिच्छेदाचे श्रीमल्लिंगराजकृत संस्कृत रूप आणि त्याखाली 'श्रीशांतेश्वरकृत प्राकृत ओव्या' छापल्या असून मधून मधून तळटीपांत काही जादा ओव्या दिल्या आहेत त्या मूळ निजगुण शिवयोगींच्या कन्नड ग्रंथात असणाऱ्या अधिक भागाचे वे. शा. रंगाचार्य मुधोळकर यांच्याकडून भाषांतर करवून घेऊन घातल्या आहेत. दुसऱ्या परिच्छेदात मात्र शांतेश्वरकृत मराठी संहिता आणि तिच्याखाली तिचेच मराठी गद्य रूपांतर देण्यात आले आहे.

या दोन्ही प्रकाशनांच्या मुखपृष्ठांवर 'श्रीनिजगुण शिवयोगीकृत विवेकचिंतामणि' असा छापलेला मथळा उघडच दिशाभूल करणारा आहे. मराठीतील हा ग्रंथ मराठी कवीच्या नावावरच नोंदला जायला हवा होता. शिवाय हे मराठीकरण निजगुण शिवयोगींच्या कन्नड ग्रंथाचेच आहे असा निर्वाळा निःसंदिग्धपणे देता येत नाही हे पुढे स्पष्ट होईलच.

## ग्रंथप्रकाशनाची घाई

विवेकचिन्तामणीची ही दोन्ही प्रकाशने संहितेच्या बाबतीत असमाधानकारक आहेत. विद्यापीठप्रकाशन तर अधिकच निराशाजनक आहे. मात्र त्यात संपादकाकडे फार दोष आहे असे मानण्याचे कारण नाही. प्रा. आवळीकरांना जे हस्तलिखित मिळाले ते सन १८४४ मधील आहे. श्रीमल्लिकार्जुनशास्त्रीना (वारद प्रकाशन) मिळालेल्या हस्तलिखिताचा काळ नमूद नाही. हस्तलिखिताची माहिती देताना ते लिहितात, "श्रीशान्तेश्वरकृत ओवीबद्ध मराठी भाषांतर रा. रा. अण्णा ढोणे वैरागकर याजकडून मोठ्या कष्टाने प्राप्त झाले. हा ओवीग्रंथ फार जुनाट असून जागजागी वाळवीने खाल्ल्यामुळे अत्यंत जीर्ण झाला आहे. तत्रापि दैवयोगे मजकूर मात्र अद्याप गहाळ झालेला नाही" पण एवढ्याने निश्चित काल ठरवता येत नाही. 'हे हस्तलिखित मिळवण्याचा प्रयत्न करूनही ते हाती लागले नाही' असे प्रा. आवळीकरांनी म्हटले आहे. एवढा प्रयत्न सोडला तर ही पोथी अन्यत्र मिळते की नाही याचा शोध त्यांनी घेतल्याचे दिसत नाही. सरस्वती महाल, तंजावर किंवा वाग्देवता मंदिर, धुळे येथील संग्रहात या ग्रंथाची एकही प्रत दिसत नाही, हे खरे. तथापि शांतपरंपरेतील एखाद्या मठात अजूनही हा ग्रंथ मिळण्याचा संभव आहे. म्हणून असे म्हणावेसे वाटते की ग्रंथप्रकाशनाची एवढी घाई करण्याचे कारण नव्हते. असे ग्रंथ पुनः पुनः छापले जात नाहीत.

१. श्रीनिजगुण शिवयोगीकृत विवेकचिंतामणि संपादक– प्रा. पंडित आवळीकर, १९६३.








आहे या परिस्थितीतही अधिक काळजी घेतली जाणे आवश्यक होते. मूळ हस्तलिखितात शब्दांची जोडतोड चुकीची असली तर ती तशीच ठेवण्यात अर्थ नव्हता. उदाहरणार्थ पुढील काही स्थळे नमुन्यादाखल पहावीत—

| | | |
|---|---|---|
| ईशान्याभि मुखे | ५०७।२ ईशान्याभिमुखे | हवे |
| अंगुळीत्रयानेयेकवट | ५२०।२ अंगुळीत्रयाने येक० | ,, |
| स्वाहाया वचनी | ५८६।२ स्वाहा या वचनी | ,, |
| प्रीति नेसाचें | ८७७।२ प्रीतिने साचें | ,, |
| ति तुल्याने | १२११।२ तितुल्याने | ,, |
| निशादहे मकूट | १५६।४ निशाद हेमकूट | ,, |

यातील शेवटची तीन स्थळे संपादकांनी टीपा देताना लक्षात घेतलेली आहेत. संहितेतच तशी दुरुस्ती त्यांनी केली असती तर वाचकांची सोय झाली असती.

३३६।२, ४२९।२, ८१२।२, १५४।३ इत्यादी ओव्या अपूर्ण आहेत. संहितेत त्या तशा दर्शवायला हव्या होत्या.

काही ओव्यातून येणारी द्विरुक्त अक्षरे संहिता देताना वगळायला हरकत नव्हती. उदा०– का कारण ७४९।२, तया–या ७५५।२ इत्यादी

दुसऱ्या परिच्छेदातील १९८ व्या ओवीत एकच चरण दोनदा आला आहे. ' प्रयोजन प्रीती ' हे शब्द एकदाच ठेवले की ओवी सुटसुटीत होते.

' त्याचे ठाई ' ( ओ. ६७, ४३१, ४३९ परि. १ इ. ), 'याचे लक्षण पुढे सांगो' (ओ. ७९ नंतर१) इ. गद्य मजकूर ओवीहून वेगळा दाखवणे भाग होते. ८१९।२ ही ओवी नसून ते सरळ गद्य आहे. पृ. १४० ते १४३ वर गद्य मजकूरच आहे तरीही तेथे ८२४ ते ८३३ असे ओवीक्रमांक आहेत आणि परत १४३ व्या पानावर ८२४ पासून पुढचे ओवीक्रमांक आहेत. मधूनमधून आढळणाऱ्या या गद्याचा संपादकांनी कोठेच विचार केलेला नाही.

ओवीस क्रमांक नसणे ( ११६९।२ नंतर ), एखादा क्रमांक गळणे ( ३७५।२ नंतर एकदम ३७७. वारदप्रतीतही ३७५ व ३७७ या दोन ओव्यांच्या मधील ओवी आढळत नाही. ), अनुष्टुभांना ओवीक्रमांक देणे ( ४५, ४६।१० ), ३१२।१ या संस्कृत श्लोकास ओवीक्रमांक देणे ( वारदप्रतीत याला क्रमांक नाही. शिवाय हाच श्लोक दुसऱ्या परिच्छेदाच्या प्रारंभी आहे. ) अशा चुका मुळात असल्या तरी विद्यापीठ प्रकाशनात राहायला नको होत्या.

वारदप्रतीत पहिल्या परिच्छेदात पाच ओव्या अधिक आहेत. त्यांची नोंद व्हायला हवी होती. वारदप्रतीत अधिक आलेला भाग त्या त्या ठिकाणी तळटीपात द्यावयास पाहिजे होता. पहिल्या दोन परिच्छेदांचे वारदप्रतीतील पाठभेद त्या त्या ठिकाणी तळटीपात आले असते तर अभ्यासकांची अधिक सोय झाली असती.

संहितेच्या दृष्टीने एवढा विचार पुरे. प्रस्तावनेमधील काही विधानांचा अधिक विचार मला करावयाचा असल्याने तिकडे वळतो.

## ' विवेकचिन्तामणी'चा कर्ता

' विवेकचिन्तामणि ' नावाचा कन्नड ग्रंथ ज्ञानकोशासारखा असून तो गद्यात लिहिलेला आहे. त्याचे लेखक निजगुण शिवयोगी. पण निजगुणांचा काल अनिश्चित आहे. विजापूरचे माझे एक ज्येष्ठ स्नेही श्री. ना. ब. जोशी 'परमानुभवबोधा'च्या प्रस्तावनेत लिहितात, ' श्रीनिजगुणांचा कालही खि. सन १२५० पासून १६५० पर्यंत हेलकावे खात आहे. या चारशे वर्षांच्या दरम्यान ते केव्हातरी होऊन गेले असे म्हटले जाते. ज्ञानकोशात [ भाग १० वा ( क ) पान ३०६ ] निजगुण १७ व्या शतकाच्या मध्यावर झाले असे म्हटले आहे ' ( श्रीनिजगुण शिवयोगीकाल व कार्य, पृ. ४ ). म्हणजे ज्यांच्या ग्रंथाचा आधार शांतलिंगाप्पा घेतात असे म्हटले जाते त्या मूळ ग्रंथकाराचा काल ठरलेला नाही. या चारशे वर्षांच्या ( किंवा प्रा. माळवाड म्हणतात त्याप्रमाणे ' १२ व्या शतकापासून ते १७ व्या ²शतकापर्यंत ' म्हणजे पाचसहाशे वर्षांच्या ) दीर्घावधीत एकाहून अधिक ' निजगुण शिवयोगी ' होऊन गेले असण्याचीही

२. Studies in Education and Culture, in honour of shri D. C. Pavate Page 369.








शक्यता आहे. प्रस्तुत निजगुणांची कालनिश्चिती या मराठी अनुवादाच्या कालनिश्चितीवरून करता येणे शक्य आहे पण त्यासाठी मराठी अनुवादाचा काल संशयातीतपणे सिद्ध व्हायला हवा आणि मराठी 'विवेकचिन्तामणि' कन्नड विवेकचिन्तामणीचाच अनुवाद आहे हे एखाद्या उभयभाषाकोविदाने निभ्रांतपणे सांगायला आहे. श्री. ना. ब. जोशी तर एकदा 'सविवेचन भाषांतर' (पृ. १) म्हणतात तर एकदा 'ओवीबद्ध रूपांतर' (पृ. ५) म्हणतात.

निजगुणांनी दोन संस्कृत ग्रंथ लिहिले असावेत असा तर्क केला गेला असून श्री. ना. ब. जोशी त्यांची नावे 'दर्शनसार' आणि 'आत्मतर्कचिंतामणि' (पृ. ६) अशी देतात तर मल्लिकार्जुन शास्त्री 'शिवतर्कचिंतामणि' (प्रस्तावना पान १ वरील टीप) नामक एकाच ग्रंथाचे (विवेकचिन्तामणीत निजगुणांनीच उल्लेख केल्याचे सांगून) नाव देतात. मात्र निजगुणाचे इतर सात ग्रंथ कन्नडमध्ये आहेत हे जसे त्यांनी स्पष्ट म्हटले आहे तसे 'शिवतर्कचिन्तामणी'च्या भाषेसंबंधात त्यांनी काहीच विधान केलेले नाही. निजगुणांनी 'विवेकचिन्तामणि' कन्नडमध्ये रचला असेल तर तोच परत संस्कृतमध्ये त्यांनीच रचला असण्याची शक्यता कमी वाटते, किंवा आधी संस्कृतात रचला असेल तर मग परत कन्नडमध्ये रचण्याचा संभवही कमीच.

श्री. रा. चिं. ढेरे एक वेगळीच माहिती देतात. 'दत्तसंप्रदायाचा इतिहास' या पुस्तकात (द्वितीयावृत्ती) आंध्रातील परमानंदतीर्थांच्या 'विवेकचिन्तामणि' याच नावाच्या तेलगू ग्रंथाची ओळख करून देताना त्यांनी म्हटले आहे, 'या ग्रंथाची दोन हस्तलिखिते तंजावरच्या सरस्वती महाल ग्रंथालयात (क्र. ७५२०, ७५२१) आहेत. "हा ग्रंथ निजगुण शिवयोगी यांनी तेलगुतून कानडीत अनुवादित केला आहे," अशी टीप प्रा. रावांनी दिली आहे. ही टीप आपल्या दृष्टीने फार महत्त्वाची आहे. कारण निजगुण शिवयोगींच्या 'विवेकचिन्तामणी'चे मराठी रूपांतर एकनाथकालीन लिंगायत मराठी संत शांतलिंगस्वामी यांनी केले आहे. 'विवेकचिन्तामणि' ही निजगुण शिवयोगी यांची स्वतंत्र रचना आहे, अशी कानडी पंडितांची आजवरची धारणा आहे. निजगुणांच्या प्रस्तुत ग्रंथाचे मूळ तेलगूत आहे, याची कानडी पंडितांनाही कल्पना नसावी' (पृ. १८८).

ही भिन्न भिन्न मते पाहिली तर आज एवढेच म्हणता येते की निजगुणांनी 'विवेकचिन्तामणि' नावाचा एक ग्रंथ लिहिला. तो कन्नडमध्ये की संस्कृतमध्ये या बाबतीत साशंकता. कन्नडमध्ये लिहिला असेल तर त्याचे मूळ प्रा. राव म्हणतात त्याप्रमाणे तेलगूत आहे की आणखी एखाद्या संस्कृत ग्रंथात आहे याचा निर्णय आज लागलेला नाही.

शांतलिंगाप्पांनी 'विवेकचिन्तामणि' या कन्नड गद्य ग्रंथाचाच अनुवाद वा भाषांतर केले हे अंतर्गत पुराव्यावरून सिद्ध होत नाही.

आपण 'विवेकचिन्तामणि' या कन्नड ग्रंथाचा अनुवाद करीत आहोत असे शांतलिंगाप्पांनी कोठेही म्हटलेले नाही, उलट–

'श्रीमद्यनेक सुरवरादिक । सन्मत्तानें शोभे विवेक–
चिंतामणी म्हणिजे तारक । संस्कृत शास्त्र ॥ १४० ॥
–परि. १० ॥'

असे ते म्हणतात. म्हणजे 'विवेकचिन्तामणी हा अनेक देवतादिकांच्या संमतीने शोभणारा ग्रंथ म्हणजे संस्कृत तारक शास्त्र' असा हा त्यांचा अभिप्राय त्यांच्यासमोर 'विवेकचिन्तामणि' नामक संस्कृत ग्रंथ असावा असे सांगणारा वाटतो. पुन्हा–

'ते विवेकचिन्तामणी शास्त्र ।
प्राकृत भाषा सविस्तार ।
सांगिजेल म्हणे शान्तेश्वर ।
जगस्वहीतनिमित्यें ॥ २७ ॥ परि. १ ॥',
'तयाचिये युक्तीवरीं ।
मी प्राकृत भाषा बोलिलो वैखरीं' ॥ १२०४ ॥
–प. १ ॥,
'इति सकळ वेदशास्त्रार्थ ।
मुख्य निरोपिला प्राकृत' ॥ १ ॥ प. २ ॥

या ठिकाणी मूळ संस्कृताच्या अपेक्षेने 'प्राकृत भाषा' असे शब्द शांतलिंगाप्पांनी वापरले असावेत. पण निजगुणांचा संस्कृत विवेकचिन्तामणि उपलब्ध नाही. शांतलिंगाप्पांच्या समोर निजगुणांचा ग्रंथ असावा असे ज्या आधारावर म्हटले जाते तो भाग असा आहे–











' निजगुणाचेनि योगेश्वरें । जें साक्षात् शंभूच्या पुत्रें ।
तयाचे चरित्र अपारें । सांगीतलें असें ॥१२०३॥
तयांचेये युक्तीवरीं । मी प्राकृत भाषा बोलिलो वैखरीं ।
ते प्रीति पावो सर्वेश्वरीं । श्रीशंभो नीळकंठी
॥ १२०४ ॥ प. १॥ '

या ओव्यांचा अन्वयार्थ लावताना ' तयाचे ' म्हणजे कोणाचे हे स्पष्ट होत नाही. वारदप्रतीत या ओव्या अशा आहेत—

' निजगुण देव योगेश्वर । जो साक्षाच्छंभूचा वरपुत्र ।
तयाशे चरित्र अपार । सांगत असे ॥ १२०९ ॥
तयाचे युक्तिवरी । मी प्राकृत भाषा बोलिलो वैखरी ।
तो प्रीति पावो सर्वेश्वरिं । श्रीशंभो नीलकंठी
॥ १२१० ॥ प. १॥ '

—याचा गोळाबेरीज अर्थ साधारणपणे असा होईल. प्रत्यक्ष शंकराचे वरपुत्र जे निजगुण योगेश्वर त्यांचे चरित्र ( महत्कृत्ये ? ) खूप काही सांगते. त्या त्यांच्या युक्तीच्या आधारे मी प्राकृत भाषेत हे बोललो. सर्वेश्वर श्रीशंभो नीलकंठाच्या ठिकाणी तो ( ? ) प्रीती पावो म्हणजे श्रीशंभूनीलकंठाला आवडो'. येथे 'युक्ती' ऐवजी ' उक्ती ' असा पाठ असेल काय ? तरीही ' चरित्र ' हा शब्द अडचणीतच टाकतो० शांतलिंगाप्पानी कन्नड ग्रंथ आधाराला घेतला नसावा याला आणखीही कारण देता येईल.

यापूर्वी कै. खरशीकरशास्त्रांच्या संपादनाने प्रसिद्ध झालेल्या ' कर्णहंस ' ( कर्णहस्तिकी किंवा हस्तकी—गो. का. चांदोरकर—भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त शके १८३७ , कर्णहस्तिकी—महाराष्ट्र सारस्वत—भावे चतुर्थ आ. पृ. ४३५ ; कर्णहस्तकी—पांगारकर—म. वा. इ. खंड ३ पृ. ५२९ ; करणहासकी ( कर्णहस्तकी ) कर्णहास्य—सरस्वती महाल यादी व्हॉ. १ ; कर्णहंसकी—कर्णहंस ओ. १४ ) या ग्रंथात तर मूळ संस्कृत श्लोक उद्धृत करूनच शांतलिंगाप्पांनी टीका लिहिली आहे. विवेकचिंतामणीतही मधून मधून संस्कृत वचने (४०।१, ८४६।१ इ. ) व श्लोक ( ३१२।१, ४५-४६।१० ) ते उद्धृत करतात. यावरून त्यांचा संस्कृतचा व्यासंग जसा सिद्ध होतो तसा कन्नड भाषेचा होत नाही. साहजिकच शांतलिंगाप्पाना कन्नड भाषा येत असेल की नाही याचीच जेथे शंका निर्माण होते तेथे ' शांतलिंगस्वामींची मातृभाषा कन्नड असावी ' ( प्रस्तावना पृ. ६२ ) हे प्रा. आवळीकरांचे विधान संशोधनक्षेत्रात टिकण्यासारखे नाही. खुद्द आवळीकरांनीच पुढे म्हटले आहे ' परंतु कन्नड भाषेची छाया ' विवेकचिंतामणी ' वर पडलेली आढळत नाही ' ( प्र. पृ. ६२ ). पण हे विधान एखाद्या उभयभाषापंडिताने करायला हवे. कन्नड ही शांतलिंगांची मातृभाषा असती तर तसा निर्देश त्यांनी जरूर केला असता. ' गुरुचरित्रा'चा कर्ता सरस्वती गंगाधर ' भाषा न ये महाराष्ट्र ' ( गुरुच. १·४९ ) असा आवर्जून उल्लेख करतो. आपल्याला संस्कृताचा अभ्यास नसल्याने कर्नाटककवी कुमारव्यासाच्या आधाराने आपण ग्रंथविलास आरंभिल्याचे महाभारत रचणाऱ्या चंद्रात्मज रुद्राने सांगितले आहे. निजगुण शिवयोगी आणि चन्नबसवेश्वर हे कर्नाटकातील सत्पुरुष आहेत, त्यांनी काही कन्नड रचना केलीही आहे पण तेवढ्यावरून शांतलिंगाप्पांनी कन्नड ग्रंथांचाच अनुवाद केला असे म्हणणे बरोबर ठरणार नाही.

श्रीचन्नबसवेश्वरांच्या 'करणहसुगे' या कन्नड ग्रंथाचा ( हा ग्रंथ तर उपलब्धच नाही ) शांतलिंगस्वामींनी अनुवाद केला असेही प्रा. आवळीकर म्हणतात. हा विचार दुसऱ्या कोणीही मांडलेला नाही. ' त्यांना ( शांतलिंगाप्पांना ) संस्कृत उत्तम येत असावे, हे चन्नबसवेश्वराचे सूत्रावर त्यांनी टीका केल्यामुळे सहज दिसते' (श्रीशांतलिंगप्पा महाराज यांचे चरित्र, पृ. १४) असे कै. खरशीकरशास्त्री म्हणतात तर श्री. य. खु. देशपांडे लिहितात, ' प्रस्तुत कर्णहंस ग्रंथ लिंगायतपंथप्रवर्तक श्रीबसवेश्वर यांचे भाचे आणि पंथाचे एक श्रेष्ठ आचार्य यांनी केलेल्या सदतीस संस्कृत श्लोकांच्या एका अध्यात्मग्रंथावर श्रीशांतलिंगाप्पा या थोर विभूतीने मराठी भाषेत केलेली ओवीबद्ध टीका होय ' ( पृ. १६ ). भावे पांगारकरही हा कन्नडचा अनुवाद आहे असे म्हणत नाहीत. तसा अंतर्गत पुरावाही त्या ग्रंथात नाही.

काही महिन्यांपूर्वी मुंबईराज्याचे भूतपूर्व महसूलमंत्री ना. म. पु. पाटील यांना भेटण्यास मी बेळगावी गेलो होतो. ' कर्णहंस ' या ग्रंथाची एक सटीक व पाठभेदासह आवृत्ती प्रसिद्ध करण्याचा त्यांचा विचार



अनुक्रमणिका






आहे. चनबसवेश्वरांचे म्हणून जे ३७ संस्कृत श्लोक मानले जातात ते चनबसवेश्वरांचे नसून आगम ग्रंथांतील आहेत असा सिद्धांत ते प्रस्थापिणार आहेत. बहुतेक श्लोकांचे उद्गम त्यांनी शोधले आहेत. या ३७ संस्कृत श्लोकांवर चनबसवेश्वरांनी कन्नडमध्ये गद्यात टीका लिहिली असे मानले जाते. अर्थात चनबसवेश्वरांची ही गद्य-कन्नड टीका उपलब्ध झाल्याविना शांतलिंगाप्पांनी त्यांचे कितपत अनुसरण केले हे सांगता येत नाही. कदाचित चनबसवेश्वरांनी एकत्रित केलेल्या या ३७ संस्कृत श्लोकांनाच चनबसवेश्वरांची कृती म्हणून शांतलिंगाप्पांनी आपल्या नजरेसमोर ठेवले असावे.

तेव्हा शांतलिंगाप्पांच्या या दोन ग्रंथांच्या संदर्भात बोलायचे तर त्यांनी संस्कृतावरूनच हे दोन्ही ग्रंथ मराठीत अनुवादले असे म्हणणे सत्यास धरून होईल.

कन्नड विवेकचिन्तामणि आणि प्रस्तुतचा मराठी ग्रंथ याच्यात आढळणाऱ्या विरोधी स्थळांचा आणि गाळलेल्या किंवा अधिक आलेल्या स्थळांचा विचार संस्कृत विवेकचिन्तामणीच्या उपलब्धीनंतर अधिक योग्य तऱ्हेने होऊ शकेल. तोपर्यंत निर्णयात्मक विधाने एककल्लीपणाची आणि दुराग्रहाची ठरतील.

## वडगावमठाची स्थापना

वडगाव येथील ‘ गादीची मूळ स्थापना शांतलिंगाप्पा ऊर्फ शांतेश्वर महाराज यांनी केली’ (महाराष्ट्र सारस्वत पृ. ४३४ ) आणि ‘ शके १५०४ मध्ये वट ग्राम ऊर्फ वडगाव येथे येऊन यांनी ( कृष्णाप्पांनी ) तेथे मठाची स्थापना केली ’ ( पृ. ४३५ ) अशी दोन वेगवेगळी विधाने कै. भाव्यांनी केली आहेत. प्रा. आवळीकरांनी ही दोन्ही विधाने प्रस्तावना पृ. ११ व १६ वर उध्दृत केली आहेत. पण शांतलिंगाप्पांची कालमर्यादा ठरविण्यासाठी त्यांनी विशेष विचार वा चर्चा न करता कै. भाव्यांच्या पहिल्या विधानाकडे आपला कल दर्शविला आहे. किंबहुना या दोन्ही विधानांत परस्परविरुद्धत्व आहे हे त्यांच्या लक्षातच आलेले दिसत नाही. अन्य आधारही प्रा. आवळीकरांनी पाहिलेले नाहीत. कै. जनार्दन बाळाजी मोडकांनी इ. स. १८९९ त ‘ जयराम स्वामी वडगावकर त्यांचे गुरु परमगुरु व शिष्यप्रशिष्य यांच्या चरित्राची बखर ’ प्रसिद्धिली आहे. तीत वडगाव मठाची स्थापना शांतलिंगाप्पांनी केली असे कोठेच म्हटलेले नाही. शांतलिंगाप्पांचे एक शिष्य कृष्णाप्पा ऊर्फ कृष्णदास हे वारुळवाणे ( उरुणाबाद- रामदास स्वामींची बखर; उरुण ब्रहे - आचार्य कालगावकर ) येथील कुलकरणी. शांतलिंगांच्या अनुग्रहानंतर गावी रहात व दर महिन्याच्या शुक्ल एकादशीस श्रीशंभुमहादेव ( शिखरशिंगणापूर ) येथे गुरुदर्शनास जात. कृष्णाप्पांचा एक शिष्य कुंदाजी ( कुकजी-भक्तमंजरीमाला; कुब्जाबावा- जयरामस्वामीकृत अपरोक्षानुभूती, प्रस्तावना ) हा वडगावाचा वतनदार पाटील होता. कृष्णाप्पा उरुणब्रहे-> वडगाव-> शिखरशिंगणापूर असा मार्ग आक्रमीत असत तरीही कुंदाजी आपल्या गुरूंच्या म्हणजे कृष्णाप्पांच्या दर्शनास कृष्णपक्षातील एकादशीस गुरुग्रामी जाई. पुढे कुंदाजी पाटलाच्या ‘ शरीरास इजा ’ होऊ लागल्याने आपला नेम चालणार नाही असे त्याला वाटले आणि म्हणून त्याने कृष्णाप्पांना ‘ वडगावी रहावे ’ अशी विनंती केली. कृष्णाप्पांनी ती मानली व मग वडगावाहूनच ते गुरुदर्शनास जाऊ लागले. शांतलिंगांनी आपल्या अंतसमयी ‘आता आजपासून तू वडगावी राहून आमचे चिंतन करीत स्वस्थ असावे ’ असे कृष्णाप्पांना सांगितले. जयराम स्वामींच्या बखरीतील या वृत्तांतावरून वडगावमठाची स्थापना कृष्णाप्पांनी केली हे उघड आहे.

भारत- इतिहास- संशोधक मंडळाच्या शके १८३७ च्या इतिवृत्तात कृ. वि. आचार्य कालगावकर यांचा ‘ वडगाव मठाची परंपरा ’ हा लेख आला आहे. वडगावमठाची स्थापना कृष्णाप्पांनी केली असेच त्यांनी म्हटले आहे.

जयरामस्वामींच्या बखरीत शांतलिंगाप्पांच्या संबंधीच्या काही सुंदर आख्यायिका आल्या आहेत. तथापि शांतलिंगाच्या चरित्राविषयी निश्चित माहिती फारशी उपलब्ध नाही. अशावेळी मिळतील त्या आख्यायिका, दंतकथा लिहून ठेवणे एवढेच संशोधकाचे काम राहते. चिकित्सक बुद्धीला त्यांतील अद्भुतता पटत नाही एवढेच फार तर म्हणता येईल. कै. खरशीकरशास्त्रांनी तेच केले, पण प्रा. आवळीकरांनी ‘कै. खरशीकरांपेक्षा कै. बामणगावकर अधिक चिकित्सक






वृत्तीचे वाटतात' (प्रस्ता. पृ. १३) असे म्हणून कै. खरशीकरांना अन्याय केला आहे. चिकित्सेने मांडलेले मत बरोबरच असते असा आग्रह धरता येत नाही. खुद्द बामणगावकरानीही 'दिसतात, असावी' अशी क्रियापदे वापरून जपूनच लिहिले आहे पण आवळीकर मात्र 'बामणगावकरांचे विवेचन कोणासही मान्य होण्यासारखे आहे' असे लिहितात. बामणगावकरांचे झाले तरी तर्कच. लोकप्रसिद्ध नि ग्रंथनिविष्ट दंतकथा देणे एवढेच काम कै. खरशीकरांनी केलें.

## शांतलिंगांचा मृत्युशक

शांतलिंगाप्पांचा 'मृत्युशक अगदी तिथीसकट उपलब्ध आहे. शक १५४५ माघ शु. पौर्णिमा हा त्यांचा निधनकाल होय.' (प्रस्ता. पृ. १४). असे कै. भाव्यांच्याच आधाराने पण त्यांच्यापेक्षा जोराने आणि छातीठोकपणे प्रा. आवळीकर सांगत आहेत. कै. भाव्यांनी दिलेल्या पुढील अभंगाचाच आधार ते देतात–

'आद्य शांतेश्वर प्रसिद्ध सकळां ।
तो प्रेमजिव्हाळा कृष्णदास ।।
शके पंधराशे पंचेचाळीसांसी ।
माघ पौर्णिमेसी समाधिस्त ।।'

पण प्रस्तुत अभंगातून ही तिथी शांतेश्वरांच्या समाधिकाळाची असा अर्थ निघत नाही. यातील 'कृष्णदास' हे पद निर्णायक मानायला हवे. शांतेश्वर हे कृष्णदास नव्हेत. 'सर्वांना माहीत असलेले आद्य शांतेश्वर. प्रेमजिव्हाळाच असा कृष्णदास (किंवा कृष्ण हा दासशिष्य म्हणजे कृष्णाप्पा). तो पंधराशे पंचेचाळिसात माघी पौर्णिमेस समाधिस्थ झाला' असा या अभंगाचा अर्थ होतो आणि तो अन्य पुराव्यांनी सिद्ध होतो.

जयरामस्वामींच्या बखरीत १२ ते १४ पानांवर कृष्णाप्पांच्या समाधिप्रसंगाचे वर्णन आले आहे. तेथे 'श्रीकृष्णापास्वामी यांनी शके १५४५ माघ शुद्ध १५ रोजी समाधि घेतली' असे म्हटले आहे.

भारत इ. सं. मंडळाच्या शके १८३७ च्या इतिवृत्तातील कृ. वि. आचार्य कालगावकर यांच्या लेखात 'कृष्णाप्पास्वामी वटग्रामास आले सके १५०४ ते सके १५४९ रुधिरोद्गारी नाम संवछरे माघ शु।। १५ स समाधिस्त जाहाले' (बखरीच्या स्वरूपाची तीन पाने लेखकांना मिळाली होती त्यातील हा मजकूर आहे.) असा उल्लेख आहे. पण रुधिरोद्गारी संवत्सर १५४९ त येत नसून १५४५ त येतो. म्हणून १५४९ हा आकडा मुळात चुकीने लिहिलेला असावा किंवा ५ ऐवजी ९ असे चुकीचे वाचन केले गेले असावे किंवा ही छपाईची चूक असावी हे मान्य करावे लागते. या लेखातील इतर शक व शकांची नावे यांचा मेळ बसतो व महादेवस्वामीच्या निधनशकाव्यतिरिक्त इतर सर्व शक व तिथी जयरामस्वामींच्या बखरीतील शकतिथींशी जुळतात.

जयरामस्वामींच्या अपरोक्षानुभूती ग्रंथाच्या प्रस्तावनेत 'कृष्णाप्पा स्वामींनी शके १५४५ त जीवंत स्थळसमाधी' घेतल्याचा निर्देश आहे.

'कृष्णापा आपा यांनी जिवंत समाधि १५४५ रुधिरोद्गारी नाम संवत्सरी माघ शुद्ध पौर्णिमेस घेतली' असेच हनुमंत स्वामीची बखर सागते.

'भक्तमंजरीमाले'च्या चौदाव्या अध्यायात 'शके १५६० माघमास । ... परिधावी संवत्सर आदित्तवार पौर्णिमा' असा कृष्णाप्पांचा समाधिकाल नमूद आहे. पण १५६० त 'परिधावी' नाही, 'बहुधान्य' आहे. पण माघी पौर्णिमा आदित्यवार हा योग शके १५४५ त येतो. म्हणून येथे १५६० हा शकांक व शकनाम यांची नोंद चुकीची आहे.

संत-कवि-काव्य-सूचीमध्ये गो. का. चांदोरकर कृष्णाप्पांचा समाधिशक १५४५ हाच देतात.

श्रीरामदासी संशोधनाच्या द्वितीय खंडात 'कृष्णस्वामी (१५४५ माघ शु. १५)' असा त्यांचा समाधिशक कै. समर्थभक्त शंकरराव देवांनी दिलेला आहे.

इतक्या ठिकाणी कृणाप्पांचा समाधिशक १५४५ हा दिला असताना तोच शांतलिंगाप्पांचा निधनशक म्हणून आवळीकर मानतात ते केवळ हा ग्रंथ शके १५२६ मध्ये लिहिला गेला असे त्यांना ठरवायचे असल्याने व अन्य आधार त्यांनी पाहिलेच नसल्याने शके १५४५ हा कृष्णाप्पांचा निधनशक म्हणताना 'भाव्यांनी फारसा विचार केलेला दिसत नाही' असे आवळीकर लिहितात. पण खरे म्हणजे शांतलिंगाप्पांचा






निधनशक ठरवताना आवळीकरांनी मुळीच विचार केलेला नाही. ' एकाच दिवशी शांतलिंग व कृष्णाप्पा या दोघांनी समाधी घेतली असे मानणे बुद्धीला पटत नाही ' असे ते म्हणतात. येथे बुद्धीला पटण्या न पटण्याचा प्रश्नच नाही. दोघांनी एकाच दिवशी समाधी घेतली असा पुरावा असेल तर तसे मानणे भागच आहे. पण जयरामस्वामींच्या बखरीवरून शांतलिंगाप्पांच्या समाधीनंतर बराच काळ कृष्णाप्पा हयात होते आणि वडगावमठाच्या स्थापनेच्या आगेमागे पण जवळच्याच काळात शांतलिंगाप्पा समाधिस्थ झाले होते असे मानावे लागते. शके १५१० च्या पूर्वी शांतलिंगांनी आपली जीवनयात्रा संपवली होती असे मान्य करणे भाग आहे असे मला वाटते.

## ग्रंथनिर्मितिशक

हस्तलिखितातील संहिता जशीच्या तशी म्हणजे मुळातील चुकीच्या जोडतोडी ठेवून छापली आहे. मात्र कालोल्लेखाचा शेवटचा भाग मूळ संहितेनंतर अर्धवटच छापला आहे. संहिता संपल्यानंतर हस्तलिखितात असणारा पूर्ण स्थलकालोल्लेख असा– ' क्रोधीनाम संवत्सरे अश्वीन वद्य १३ त्रयोदशी गुरुवारी विवेकचिंतामणी ग्रंथसमाप्ति ॥ ' (संहिता पृ. ३४१)

' शके १७६६ क्रोधीनाम संवत्सरी श्रीशंभूमहादेवी ग्रंथसमाप्ति ॥ हे पुस्तक नऱ्होजी बिन चणगवंडा पाटील राजमाने मौजे निपाणी याचे पुस्तक असे ॥ ' (प्रस्ता. पृ. १५). वास्तविक कालोल्लेखादिकांचा हा उत्तरभाग मूळसंहितेच्या अखेरीसच छापावयास हवा होता. निदान प्रस्तावनेत तो नमूद केला असल्याने हा कालोल्लेख तपासून पाहणे शक्य झाले आहे. कालोल्लेखात दोन्ही ठिकाणी ' ग्रंथसमाप्ति ' असाच शब्द आहे. मग एक प्रत्यक्ष मूळ ग्रंथाच्या निर्मितीचा आणि दुसरा प्रस्तुत प्रतीच्या लेखनाचा असे का मानावयाचे ? ग्रंथकार जेव्हा ग्रंथनिर्मितीचा काल निर्देशितो तेव्हा तो मूळ संहितेत शेवटी येतो. येथे ' नीळकंठार्पणमस्तु ' असे लिहून ग्रंथसमाप्ती झाल्याचे दर्शविल्यानंतर हा कालोल्लेख आला असल्याने तो कवीने नोंदला असेल असे म्हणता येत नाही. शिवाय पूर्वार्धातील नोंद ही ग्रंथनिर्मितीची मानावी तर तेथे शकांक नाही आणि उत्तरार्ध प्रतलेखनाचा मानावा तर तेथे तिथीचा निर्देश नाही. असे अर्धवट उल्लेख सहसा कोणी करीत नाही. म्हणून ' क्रोधीनाम संवत्सरे अश्वीन वद्य १३ गुरुवारी शके १७६६ शंभूमहादेवी ग्रंथसमाप्ति ' हा एकच निर्देश मानावयास हवा. तो ग्रंथनिर्मितीचा असण्यापेक्षा प्रतलेखनाचा असण्याची शक्यता अधिक. हे दोन भिन्न काळांचे निर्देश आहेत असे मान्य करणे अवघड आहे. आता पिल्लेजंत्रीप्रमाणे ' क्रोधीनाम संवत्सर अश्वीन वद्य त्रयोदशी गुरुवार ' हा योग शके १५२६ मध्ये येतो हे खरे पण मग शके १७६६चे काय करावयाचे ? शिवाय शके १५२६ मध्ये ग्रंथलेखन करण्यास शांतलिंगाप्पा हयात नव्हते त्याला काय करावयाचे ? मोडकजंत्रीप्रमाणे शके १७६६ च्या आश्विन वद्य त्रयोदशीस शुक्रवार आहे, गुरुवारी द्वादशी आहे. म्हणजे तिथीचा व शकाचा मेळ बसत नाही असे वरवर पाहिले असता वाटते. जंत्रीमध्ये सूर्योदयाची तिथी दिलेली असते. शिवाय–

' यां तिथिं समनुप्राप्य उदयं याति भास्करः।
सा तिथिस्सकला ज्ञेया दानाध्ययनकर्मसु ॥ '

– अशी पद्धतीही आहे. तथापि कोणी कालनिर्देश अचूक करू इच्छित असेल तर तो दिवसाच्या त्या त्या वेळी असणारी तिथीही नोंदू शकेल. ' जनने मरणे चैव तिथिस्तात्कालिका स्मृता ' असाही नियम आहे. शके १७६६ क्रोधीनाम संवत्सर आश्विन वद्य १२ गुरुवार या दिवशी सूर्योदयाला द्वादशी असून ती ३५ घटी ४८ पळापर्यंत आहे. त्यानंतर गुरुवारीच त्रयोदशी सुरू होते. म्हणजे शके १७६६ मधील गुरुवारच्या आश्विन वद्य त्रयोदशीचा हा उल्लेख प्रतलेखन त्या दिवशी सायंकाळानंतर म्हणजे घटी ३५ पळे ४८ नंतर झाले असले पाहिजे असे सांगणारा आहे. म्हणजेच शके १७६६ आश्विन वद्य १३ गुरुवार हा कालोल्लेख अचूक आहे हे स्पष्ट आहे.

शके १५२६ हा जसा ग्रंथनिर्मितीचा काल नव्हे त्याचप्रमाणे शके १५४५ हा शांतलिंगाप्पांचा समाधिशक नव्हे. ज्या दोन शकावर भिस्त ठेवून प्रा. आवळीकर कालनिर्णय करू पाहतात तेच असे ढासळत असल्याने एतद्विषयक त्यांचे सारे लेखन



अनुक्रमणिका






अपुऱ्या माहितीवर आणि कच्च्या संशोधनावर आधारलेले आहे असे नाइलाजाने म्हणावे लागते.

## शांतपरंपरा

"'शांतिपंचीकरण' हा ग्रंथ पुरंदरे आणि कंपनी याणी पदच्छेद करून, टिपा देऊन व शुद्ध करवून "गणपत कृष्णाजी प्रेस" मध्ये छापून प्रसिद्ध केला. शके १८२३ सन १९०१" हा छापील ग्रंथही आवळीकरांनी पाहिला नाही. त्यांनी तो समग्र पाहिला असता तर तो जयरामस्वामींचा नव्हे असे स्पष्ट विधान कदाचित त्यानी केले असते. तसे नाही म्हणूनच 'हेच नाव ( शांतपरंपरा ) जयरामस्वामींनीही ' शांतिपंचीकरण' ग्रंथात दिले आहे', 'जयरामस्वामींच्या म्हणून दिलेल्या 'शांतिपंचीकरणा'तील उताऱ्यात', 'त्याचप्रमाणे एकविसाव्या ओवीतील सात नावे जयरामस्वामींच्या नंतर झालेल्या पुरुषांची आहेत. जयरामस्वामी ती नावे कशी देतात ?', ' 'शांतिपंचीकरण' हे जयरामस्वामींचेच मानावयाचे झाले तर, एकविसावी ओवी ही कोणीतरी नंतर घुसडली आहे', "शांतिपंचीकरणा'चा कर्ता दुसराच कोणीतरी असावा आणि तो दशरथ शांतानंतरचा असावा' अशी धरसोडीची विधाने त्यांना करावी लागली आहेत. छापील शांतिपंचीकरण[3] मी पाहिले आहे. शिवाय याची एक त्रुटित हस्तलिखित प्रत गुरुवर्य बाबूराव ऊर्फ धों. द. शांत ( रा. संकेश्वर, जिल्हा बेळगाव ) यांच्याकडून मला मिळाली आहे. या दोहोंच्या आधारे मी निःशंकपणे म्हणू शकतो की हा ग्रंथ दशरथ शांतांनी लिहिलेला आहे. छापील ग्रंथात ग्रंथनिर्मितिकालाच्या ओव्या छापल्या गेलेल्या नाहीत. मजकडील हस्तलिखितात त्या अशा आहेत–

' शके सत्तराशे पंचतीस ।  
चैत्र शुद्ध प्रतिपदा दिवस ।  
श्रीमुखनाम संवत्सरास ।  
भृगुवार वसंत ऋतु जाणावा ॥ ५८ ॥  
रेवती नक्षत्र प्रथम प्रहरी ।  
अमृतवेळ कल्याणकारी ।  
श्रीशांतलिंग दत्तावतारी ।  
वदला वैखरी दशरथ शांत ॥ ५९ ॥ '

यावरून दशरथ शांतांनी[4] हा ग्रंथ शके १७३५ त लिहिला हे उघड आहे. या ग्रंथाच्या पस्तिसाव्या अध्यायातील ( छापील ग्रंथातील ) वीस आणि एकवीस यामधील गळलेली ओवी अशी आहे––

' नीलकंठ काशीपती शांतमूर्ती ।  
चाळीस जाले यथानिगुती ।  
श्रीकृष्ण क्लेशहरण जयराम गणती ।  
निरंजन स्वामी त्रेच्याळ हे ॥ '

प्रा. आवळीकरांच्या संशोधनास साह्य करावे या हेतूने मजकडील 'परंपरा परम पुरुष आराधन' हे सुखबोधकृत १२५ ओव्यांचे हस्तलिखित प्रकरण मी त्यांच्या स्वाधीन केले होते. ते हाती लागताच मला न विचारताच त्यावर एक लेख नवभारतात त्यानी प्रसिद्ध केला होता. प्रस्तुत हस्तलिखित मजकडून मिळाल्याचा निर्देशही त्यांनी त्या लेखात केला नव्हता. पण पुढे हुबळीच्या एका कन्नड वर्तमानपत्रामध्ये नवभारतमधील त्या मराठी लेखाचे कन्नडमध्ये भाषांतर

३. हे ग्रंथनामही चुकीचे वाटते. यात पंचीकरणाचा विषय नाही. मजकडील हस्तलिखितात काही अध्यायांच्या शेवटी 'शांति-प्रकरण' असे नाव आढळते व तेच योग्य वाटते.

४. या सत्पुरुषांनी शके १७५८ आश्विन वद्य अष्टमीस देह ठेवला. 'इंद्रायणी'च्या १९६२ च्या दीपावली अंकात ( वर्ष १ अंक १ ) श्री. रा. चिं. ढेरे यांनी 'शांतबोध' या त्रुटित स्वरूपात मिळालेल्या हस्तलिखिताचा "शांतलिंगस्वामींचा 'शांतबोध'" या लेखात परिचय करून दिला आहे. तेथे शेवटच्या परिच्छेदात ओवी-रचनेच्या भिन्नतेमुळे त्यांना आलेली शंका बरोबर आहे. 'शांतबोध' हा ग्रंथ शांतलिंगाप्पांचा वाटत नाही. दशरथ शान्ताच्या 'शांतिप्रकरणा'तील ओवी साडेचार चरणी आहे. म्हणून 'शांतबोध' दशरथ शान्ताचा असण्याची शक्यता आहे. शांतपरंपरेत शांतलिंगाप्पांच्या नंतर शांतबोध किंवा शांतबोधेश्वर, डफळापूरचे शांतेश्वर, संकेश्वरचे शांतलिंग ऊर्फ सातापा आणि दशरथ शांत असे सत्पुरुष होऊन गेले आहेत ( महाद्वार मासिकातील [ कोल्हापूर, वर्ष १ ले, पुष्प पाचवे ] माझा ''शान्त' गुरुपरंपरा' हा लेख पहावा. ) यापैकी एखाद्याने 'शान्तबोध' रचला असण्याची शक्यता आहे. तो प्रस्तुत शांतलिंगाप्पांचा मात्र वाटत नाही.












करवून घेऊन स्वतःच्या नावावर छापताना मात्र टीपेत माझ्या नावाचा उल्लेख त्यांनी केला होता. ' शांतपरंपरा ' हा लेख प्रसिद्ध करण्याची त्यांना इतकी घाई झाली होती की त्यामुळे सखोल विचार करण्याची आवश्यकता त्यांना वाटली नसावी. या हस्तलिखित प्रकरणाचे नाव ' परंपरा परम पुरुष आराधन ' असे असताना त्यातील ' परम ' शब्द प्रा. आवळीकरांनी गाळून टाकला. हे मूळ हस्तलिखित अलीकडेच मी ' महाद्वार ' मासिकात ' शांत गुरुपरंपरा ' या नावाच्या लेखासह प्रसिद्ध केले आहे.

सुखबोधाला दशरथ शान्ताचा शिष्य न म्हणता दत्तात्रय शांताचा शिष्य असे प्रा. आवळीकरांनी म्हटले आहे आणि दत्तात्रयशान्त हा दशरथ शान्ताचा पुत्र असेही सांगितले आहे. या ' दत्तात्रय शान्तां'चा शोध आवळीकरांनी कोठून लावला हे समजत नाही. प्रस्तुत प्रकरणातील ' शांतलिंग संकेश्वरीं ॥ ३८ ॥ ... भागीरथी तयाची पत्नी ... ॥ ३९ ॥ .... किंवा अवतरली अनुसया । अत्री ऋषीची निज भार्या । तिचा उपकार फेडावया । दत्तात्रय जन्मले ॥४१॥ तोचि अवतार सत्य जाण । दशरथ शांत नामाभिधान । ... ॥ ४२ ॥ पूर्वसुकृत ठेवा पुरा । दत्तात्रय आले शांत उदरा । ... ॥ ४३ ॥ ' या भागाचा अर्थच प्रा. आवळीकरांना समजलेला नाही. ' संकेश्वर येथील शांतलिंगांची पत्नी भागीरथी म्हणजे जणू अनुसयेचा अवतार. तिच्या पोटी दत्तात्रय अवतरले तेच दशरथ शांत.' हा सुखबोधाचा आशय पाहिला म्हणजे दशरथ शांत हे दत्तावतार असे तो सांगत आहे हे न समजल्याने दत्तात्रय हा दशरथ शान्तांचा पुत्र अशी विपर्यस्त माहिती प्रा. आवळीकर देतात. संकेश्वरातील शांत घराण्याच्या वंशावळीत दत्तात्रय हे नावच आढळत नाही. ही वंशावळ पुढे देत आहे.[५]

## विवेकचिन्तामणीची भाषा आणि काव्यमयता

या मथळयाखाली सुमारे १५ पृष्ठांचा मजकूर प्रा. आवळीकरांनी लिहिला आहे. एक तर ही संहिता अगदी अलीकडची आणि बरीचशी अशुद्ध. त्यामुळे भाषेचा विचार हा शके १७६६ च्या प्रतीच्या भाषेचा विचार ठरतो. शांतलिंगाप्पांची भाषा ' कर्णहंसा'त काहीशी आढळते. चुकीच्या संहितेचे भाषाशास्त्रीय

५.–




धोंडदेव ऊर्फ बाबूराव ( शांत घराण्याचे सध्याचे प्रमुख )

* यांनी ' शांतिप्रकरण ' शके १७३५ त लिहिले. यांचा निधनशक १७५८.



अनुक्रमणिका

विशेष सांगताना झालेल्या एका गमतीचे उदाहरण पहा– वर्णविपर्ययाचे एक उदाहरण प्रा. आवळीकरांनी 'सकळ < कळस' असे नोंदले आहे (पृ. ६४). अक्षरांची उलटापालट होऊन झालेले लेखन वर्णविपर्ययाचे मानायचे झाल्यास अनवस्था प्रसंग ओढवेल. वर्णविपर्यय होण्यालाही काही कारणे असतात हे अभ्यासकांना सांगण्याची गरज नाही. काव्यदृष्ट्याही या ग्रंथाचे महत्त्व नजरेत भरण्यासारखे नाही. प्रतलेखकाच्या निष्काळजीपणामुळेही असेल पण ठिकठिकाणी प्रसादगुणाची हानी झालेली आहे.

विवेकचिन्तामणीतील तत्त्वज्ञानासंबंधी लिहिण्याचा माझा अधिकार नाही.

प्रा. आवळीकरांच्या संशोधनाला साह्य व्हावे आणि त्यांनी केलेल्या विधानांचा ऊहापोह करावा या इच्छेने हा लेख लिहिला आहे. सत्यासत्याची छाननी वाचकांनीही करावी. वाङ्मयेतिहासलेखकांना शांतलिंगाप्पांच्या विषयी काही निश्चित विधान करण्यास या लेखाची मदत होईल.

उभयता विद्यापीठांच्या संयुक्त प्रकाशनांतून अधिक निर्दोष कृती बाहेर याव्यात व डॉ. आवळीकरांनी कर्नाटकातील वास्तव्याचा आणि आपल्या कष्टाळुपणाचा अधिकाधिक लाभ द्यावा अशी इच्छा व्यक्त करतो आणि एक प्राचीन ग्रंथ मराठी वाचकांना उपलब्ध करून दिल्याबद्दल उभय विद्यापीठांचे–विशेषतः कर्नाटक विद्यापीठाचे आणि डॉ. आवळीकरांचे अभिनंदन करतो.










प्रा. वा. के. लेले

# दण्डीचा काव्यादर्श : एक अध्ययन

(१) संस्कृत साहित्यशास्त्राची परंपरा अतिशय प्राचीन व प्रदीर्घ आहे. भरतप्रणीत नाट्यशास्त्र हा ह्या परंपरेचा आदि मानला जात असून जगन्नाथ पण्डिताचा रसगङ्गाधर हा अधिकृत अन्त मानला जातो. ह्या आदि-अन्तांच्या मधल्या काळात जे अनेक थोर साहित्यशास्त्रज्ञ होऊन गेले, त्यांमध्ये 'काव्यादर्शा'चा कर्ता दण्डी याची प्रामुख्याने गणना होते. दण्डी हा संस्कृत काव्यशास्त्राच्या आदियुगतील ग्रंथकार आहे. त्याचा ग्रंथ शास्त्रीय असूनही सुबोध व काव्यमय असल्यामुळे विद्वानांच्या आदरास पात्र झाला आहे. ह्या ग्रंथात दण्डीने 'काव्यांचे शब्दालंकार, अर्थालंकार, चित्रालंकारांचे अनेक प्रकार, (प्रसादादि) गुण, (अपार्थकत्वादि) दोष ह्या विषयांचे' संक्षेपाने निरूपण केले आहे' (शब्दार्थालंक्रियाः चित्रमार्गाः सुकरदुष्कराः । गुणाः दोषाश्च काव्यानां इह संक्षिप्य दर्शिताः ॥ –काव्यादर्श ३।१८६). सदरहू विषयांचे निरूपण करिताना दण्डीने वाणीचा महिमा, काव्याचे प्रयोजन, काव्याची अक्षरता, काव्यशास्त्राची आवश्यकता, काव्याची निर्दोषता, शास्त्राभ्यासाची आवश्यकता, काव्यांतील शब्दार्थालंकारांचे स्वरूप इत्यादि मुद्यांचे प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे विवेचन केले आहे. त्याचे अनुशीलन करणे हेच प्रस्तुत लेखाचे उद्दिष्ट आहे. हा लेख लिहिताना पुढील संस्कृत टीकांचा प्राधान्याने उपयोग केलेला असून त्यांचा पुढील छेदकातून अनुक्रमे अ, ब, क, व ड असा निर्देश केलेला आहे:–

१ आचार्य रामचन्द्र मिश्रकृत 'प्रकाश' टीका;
२ श्रीप्रेमचन्द्रतर्कवागीशकृत मालिन्यप्रोञ्छनी' टीका;
३ श्रीनृसिंहदेवशास्त्रीरचित 'कुसुमप्रतिमा' टीका;
४ जीवानन्द विद्यासागर भट्टाचार्यविरचित 'विवृति'

(२) 'काव्यादर्श' ग्रंथात दण्डीला 'काव्यलक्षण' सांगावयाचे आहे (पूर्वशास्त्राणि संहृत्य प्रयोगानुपलक्ष्य च । यथासामर्थ्यमस्माभिः क्रियते काव्यलक्षणम् ॥ १/२). काव्याचे शरीर शब्दार्थरूप म्हणजेच वाणीरूप असते (तैः शरीरं च काव्यानामलङ्काराश्च दर्शिताः । शरीरं तावदिष्टार्थव्यवच्छिन्ना पदावली ॥ १/१०). त्यामुळे दण्डीने ग्रंथारंभी वाङ्महिमा गाणे सयुक्तिकच आहे. दण्डीरचित भारतीस्तोत्र असे आहे:—

इह शिष्टानुशिष्टानां शिष्टानामपि सर्वथा ।
वाचामेव प्रसादेन लोकयात्रा प्रवर्तते ॥ १/३
इदमन्धंतमःकृत्स्नं जायेत भुवनत्रयम् ।
यदि शब्दाह्वयं ज्योतिरासंसारं न दीप्यते ॥ १/४

अर्थात् – 'व्याकरणशास्त्रात पारंगत असलेल्या पाणिनिवररुचि प्रभृति विद्वानांनी ("शब्दशास्त्रप्ररूढमतिभिः पाणिनिवररुचिप्रभृतिभिः" – अ) अनुशासिलेल्या ('संस्कृत– प्राकृतानां' – अ; 'संस्कृतानां– क) संस्कृत – प्राकृत–भाषकांचा व उरलेल्यांचाही (अनुशासनरहितदेशभाषाणां – अ) म्हणजेच देशी भाषा बोलणाऱ्यांचाही म्हणजेच देवांपासून पामरांपर्यंत सर्वांचा (देवादिपामरान्तानां – ब) आहारविहारादि लोकव्यवहार वाणीच्याच साह्याने ऊर्फ कृपेने (अनुकम्पया साहाय्येन इति – ड) प्रवृत्त होतो. (१/३)

जर शब्द नामक ज्योति सृष्टीच्या आरंभापासून (सृष्टिकालं आरभ्य –अ) अथवा संपूर्ण जगतास व्यापून (जगत् अभिव्याप्य –व) तेवत नसती तर पृथ्वी, पाताळ व स्वर्ग असे हे तिन्ही लोक पूर्णपणे अंधकारमय झाले असते.' (१।४) वेगळ्या शब्दात सांगावयाचे म्हणजे कोणत्याही मनुष्याला आपले मनोगत दुसऱ्यास कळवावयाचे झाल्यास वाणीचाच आश्रय घ्यावा लागतो (वाचां अभावे कः कथं स्वाभिप्रायं स्वेतरजनवेद्यं विधातुं ईशीत' – अ). ऐहिक जीवनातला असा कोणताही व्यवहार नाही की जो शब्दांवाचून पार पाडता येईल. ('न कोप्येतादृशो व्यवहारो जगति वर्तते यो वाचां साहाय्यं अन्तरा प्रचलितो भवेत् ।' – क). सूर्य उगवला नसता तर ज्याप्रमाणे



अनुक्रमणिका

सबंध जगत् अंधकारमय झाले असते, त्याप्रमाणेच मनुष्याला वाणी लाभली नसती तर प्रेम, लोभ, मोह, असूया इत्यादि भवभावनांचे प्रकटीकरण, सूक्ष्म-स्थूल मनोगतांचे आविष्करण, विचारविकारांचा विनिमय हे सारेच व्यवहार अशक्य होऊन बसले असते. काव्य हाही एक मानवी व्यवहार आहे, तोही अपरिहार्यपणे वागधीन आहे. त्यामुळे त्या व्यवहाराच्या शास्त्राचे निरूपण करण्यास सुरवात करताना दण्डीने वाणीचा महिमा गाऊन मोठेच औचित्य प्रकट केले आहे.

( ३ ) वाणीचे गुणगान झाल्यावर ह्या वाणीने जन्मास येणाऱ्या काव्याचे प्रयोजन तरी काय, हा प्रश्न साहजिकच उपस्थित होतो. त्या प्रश्नाचे उत्तरही दण्डीने पुढील वचनांच्या द्वारे दिले आहेः-

आदिराजयशोबिम्बं आदर्शं प्राप्य वाङ्मयम् ।
तेषामसन्निधानेऽपि न स्वयं पश्य नश्यति ॥१/५.

अर्थात् ' ( इक्ष्वाकु- मान्धातृ- दिलीपप्रभृति' -अ ) आदिकालीन राजांच्या कीर्तिरूप बिंबाला वाङ्मयरूप आरसा लाभल्याने ते राजे सांप्रत जवळ नसतानाही (मृत झालेले असतानाही) ते ( म्हणजे कीर्तिरूप बिंब ) नष्ट होत नाही, हे तू स्वतःच पहा.' सच्चरित्र, विक्रान्त, दानशूर, नीतिज्ञ अशा राजांचे यशोगान करण्यासाठी काव्ये लिहिली जात असतात ( ' एतेन अतीतानां राज्ञां यशःख्यापनं काव्यप्रयोजनम् उक्तम् ' -अ) आणि अशी काव्ये चिरंजीव स्वरूपाची असल्यामुळे ती कवीसही कीर्तीचा लाभ करून देतात ( 'वस्तुतस्तु आदिराजादिचरितसंबंधिकाव्यप्रणयनेन कवेरेव यशआदिलाभ इति भंग्यन्तरेण प्रसिद्धं काव्यप्रयोजनं एव पुष्टितां नीतं इति ध्येयम् '- क ), असे प्रतिपादून दण्डीने मम्मटप्रतिपादित ' यशसे ' हे प्रयोजन निरूपिले आहे. परंतु, काव्याच्या आस्वादापासून वा रचनेपासून व्यक्तीस शुद्ध, परमोच्च आनंदाचीही प्राप्ती होते, हेही दण्डीने ग्रंथान्तीच्या पुढील श्लोकात स्पष्टपणे सांगितले आहेः-

व्युत्पन्नबुद्धिरमुना विधिदर्शितेन
मार्गेण दोषगुणयोर्वशवर्तिनीभिः ।
वाग्भिः कृताभिसरणो मदिरेक्षणाभिः
धन्यो युवेव रमते लभते च कीर्तिम् (३।१८७)

अर्थात्- ' ज्याप्रमाणे एखाद्या धनसौंदर्यशाली ('अ') तरुण पुरुषास दैवाने दाखविलेल्या मार्गाचे अनुसरण केल्याने सुंदर युवती वश होते व तिच्या सहवासात आनंदाचा लाभ होतो, त्याप्रमाणे विशुद्ध मतीच्या पुरुषास, विधिपूर्वक दाखविलेल्या ह्या मार्गाने काव्यरचनेचा वा काव्यास्वादाचा सतत प्रयत्न केल्याने ( ' काव्यं कर्तुं अवगन्तुं वा कृतोद्यमः '— ब ; ' कृतो उद्योगः शास्त्राभ्यासे सदोद्यतः पुरुषः ' — क ), वाणी वश होते आणि तिच्या संयोगयोगाने ब्रह्मास्वादसहोदरानंदाची तसेच अक्षय कीर्तीची ( ' ब्रह्मास्वादसहोदररसानुभविता जायते तथा कीर्तिं च ...प्राप्नोति—क ) प्राप्ति होते. ' म्हणजे युवतीसहवास लाभणाऱ्यास फक्त आनंदाचाच लाभ होतो, तर वाणी ज्यास वश झालेली आहे अशा पुरुषास आनंदाव्यतिरिक्त कीर्तीचाही लाभ होतो ( ' कीर्तिलाभः परं अस्य वाग्वशयितुः अतिरिच्यते इति ' --अ ). तात्पर्य, केवळ काव्य रचणाऱ्या कवीसच नव्हे तर काव्याचा आस्वाद घेणाऱ्या रसिकास किंवा काव्यशास्त्राचे अध्ययन करणाऱ्या अभ्यासकासही उच्च आनंदाची प्राप्ति होते, तेव्हा श्रेष्ठ आनंद हे काव्याचे प्रयोजन होय, हें दंडीने सांगितले आहे ( ' एतेन निर्वृतिः कीर्तिश्चापि काव्यस्य प्रयोजनं इति पर्यवसाने प्रतिपादितम् । -ब; 'काव्यं ज्ञातुं कर्तुं वा प्रवृत्तः निर्वृतिमान् कीर्तिमांश्च भवति इति भावः'- क ).

( ४ ) अशा प्रकारे यद्यपि काव्यास्वादकास परमोच्च आनंदाची प्राप्ति होत असली, तथापि ते काव्य कसे अभ्यासावयाचे, कसे आस्वादावयाचे त्याचे तंत्र त्याला आत्मसात् करून घ्यावे लागते. रसिकाला काव्यास्वादापूर्वी एक प्रकारची बौद्धिक पूर्वतयारी करावी लागते. वेगळ्या शब्दांत सांगावयाचे म्हणजे रसिकास काव्यशास्त्राचे अध्ययन करणे नितान्त जरुरीचे असते. दण्डीने हा विचार पुढील सुंदर उक्तींच्या व समर्पक दृष्टान्तांच्या द्वारे मांडला आहेः-

' गुणदोषानशास्त्रज्ञः कथं विभजते जनः ।
किमन्धस्याधिकारोऽस्ति रूपभेदोपलब्धिषु ॥' १।८

अर्थात्— ' काव्याचे गुण व दोष यांचा परिचय करून देणाऱ्या ( 'गुणदोषपरिचयप्रदसाहित्यशास्त्रज्ञानं'— अ; काव्यमीमांसादि– ब ) म्हणजेच काव्यमीमांसेच्या शास्त्राचे ज्ञान नसणाऱ्या मनुष्यास हे काव्यास उपकारक गुण होत, हे काव्याचा अपकर्ष घडवून आणणारे दोष











होत, हा फरक चांगल्याप्रकारे कसा लक्ष्यात येणार ? अहो, द्रव्यगुणविशिष्ट पदार्थातील हा उत्कृष्ट, हा अपकृष्ट, हा पांढऱ्या रंगाचा, हा पिवळ्या रंगाचा ( रूपाणि द्रव्यगुणविशेषाः तेषां भेदः उत्कृष्टत्व–अपकृष्टत्वरूपः श्वेतपीतत्वादिरूपः– ब ) इत्यादि भेद आंधळ्याला का जाणता येणार आहेत ? ' तात्पर्य, काव्याचे मर्म समजून घेण्यास, त्यातल्या सगळ्या खाचाखोचा लक्ष्यात येण्यास, त्यातली यच्चयावत् सौंदर्यस्थळे आस्वादण्याची कुवत अंगी येण्यास काव्यशास्त्राच्या सम्यक् ज्ञानाची नितान्त आवश्यकता आहे. काव्यशास्त्राचे ज्ञान हा जणू काव्यस्वरूप जाणण्याचा नेत्र होय. काव्यरहस्य शास्त्रैकगम्य असल्यामुळेच भरतादि पूर्वसूरींनी काव्यशास्त्रग्रंथांचे प्रणयन केले. दण्डी म्हणतो :–

अतः प्रजाना व्युत्पत्तिमभिसन्धाय सूरयः ।
वाचां विचित्रमार्गाणां निबबन्धुः क्रियाविधिम् ॥ १/९

अर्थात् — " ( गुणदोषातील फरक केवळ काव्यशास्त्रीय ज्ञानानेच समजण्यासारखा असतो ) म्हणून भरतादि पूर्वीच्या विद्वानांनी लोकांना ( काव्यापासून ) वाणीच्या चमत्कृतीचे ज्ञान व्हावे (वाग्वैचित्र्यज्ञानम्–ड; वाग्व्यवहारनैपुण्यम् –च ) किंवा त्यांचे अंगी काव्यरचनेचे चातुर्य यावे ( तद्विरचनचातुर्य- अ) ह्या उद्देशाने ( वैदर्भीगौडी-इत्यादि ) विविध रीति ज्यात आहेत अशा काव्यप्रबन्धांची रचना केली. थोडक्यात, काव्यशास्त्र म्हणजे वाग्विदग्धतेचे तसेच वाग्रचनेचे मर्म उकलणारी गुरुकिल्ली होय.

( ५ ) ही गुरुकिल्ली ज्या सहृदयास हस्तगत झाली त्या सहृदयास विशिष्ट अधिकार प्राप्त होतो. त्याची बुद्धि प्रगल्भ बनते, त्याची मानसशक्ति विकसित होते. तो काव्यगत गुण हेरून त्यांचे ग्रहण करू शकतो, दोष टिपून त्यांचे विश्लेषण करू शकतो, अलंकारांची पारख करू शकतो, रसाची रुचि ओळखू व घेऊ शकतो. काव्य-अकाव्य यांतील भेद त्याला यथार्थपणे समजू शकतो. त्याची वाङ्मयीन अभिरुचि तयार होते, त्यालाही ' कवीची दृष्टि ' प्राप्त होते. आणि मग काव्यसृष्टीतील नानारचनांवर तो आपला अभिप्राय देऊ शकतो. अशा विदग्ध, परिपक्वबुद्धीच्या सहृदयाच्या अभिप्रायाला काव्यक्षेत्रात फार महत्त्व असते हे दण्डीने चांगल्या रीतीने ओळखले होते, असे त्याच्या पुढील उक्तीवरून वाटते:–

न्यूनमप्यत्र यैः कैश्चिदङ्गैः काव्यं न दुष्यति ।
यद्युपात्तेषु संपत्तिराराधयति तद्विदः ॥ ' १/२०.

अर्थात्:– ' जर वर्णित विषयांमुळे होणारा रसपरिपोष ( ' यथालाभं वर्णितेषु संपत्तिः रसपरिपोषः– ब ) काव्याचे स्वरूप जाणणाऱ्या ( काव्यज्ञान् – ब ) किंवा काव्याचे रहस्य जाणणाऱ्या ( काव्यरहस्यज्ञातॄन् – अ ) विद्वानांना संतुष्ट करणारा असेल तर महाकाव्यात (सर्गबद्धत्व, इतिहासकथोद्भूतत्व, अलंकृतत्व इत्यादि अंगांपैकी ) काही अंगांची यद्यपि उणीव असली तथापि ते दूषणीय ठरत नाही. ' दण्डीच्या म्हणण्याचा आशय असा की, महाकाव्यात कवीने काही विषयांची वर्णने केली, काहींची केली नाहीत, तरी हरकत नाही. काव्यशास्त्राने सांगितलेल्या सर्वच्या सर्व विषयांची वर्णने प्रत्येक महाकाव्यात कवीने केलीच पाहिजेत असे नव्हे. जी वर्णने कवीने केलेली असतील ती जर रससुंदर असतील व ती जर विदग्ध रशिकांना संतोष देणारी असतील तर ते महाकाव्य, इतर विषयांची वर्णने नाहीत ह्या सबबीखातर, दूषित ठरू शकत नाही. तात्पर्य, रसिकांचा परितोष ही काव्याच्या सदसत्त्वाची कसोटी होय, हेच तत्त्व दण्डीने येथे सुचविले आहे. सुकुमारता गुणाचे विवरण करतानाही दण्डीने ह्याच मुद्यावर बोट ठेविले आहे. ' मण्डलीकृत्य बर्हाणि कण्ठैर्मधुरगीतिभिः कलापिनः प्रनृत्यन्ति काले जीमूतमालिनि ॥ '( १/७१ ) हे सुकुमारता गुणाचे उदाहरण देऊन तो म्हणतो:--

' इत्यनूर्जित एवार्थो नालंकारोऽपि तादृशः ।
सुकुमारतया एव एतद् आरोहति सतां मनः । १/७२

अर्थात— " ह्या पद्यातील अर्थ रससंपर्काभावी चमत्कारव्यंजक नाही ( रससंपर्काभावात् चमत्कारव्यंजकः न –च ), समासोक्त्यनुप्राणित स्वभावोक्तिअलंकारही तितकासा हृद्य नाही, ( असे असूनही ), सुकुमारता ह्या गुणाच्या अस्तित्वामुळेच हे पद्य रसज्ञ रसिकांच्या मनास मोहविते. ' दण्डीचा आशय स्पष्ट आहे आणि तो असा की, काव्यास काव्यत्व प्राप्त होण्यासाठी अलंकारांचीच अथवा मनोरम अर्थाचीच गरज असते असे नव्हे, एखाद्या गुणाच्याही अस्तित्वामुळे काव्य काव्यपदवीस पात्र ठरते. मुख्यतया ते रसिकांच्या पसंतीस उतरले पाहिजे. त्यांनी त्याच्यावर पसंतीचा शिक्का मारला की, मग जरी त्या काव्यात



अनुक्रमणिका

शुद्ध शास्त्रीय दृष्टीने एखादा दोष राहून गेला असला तरी तो शोभादायक धर्मच ठरतो. ह्याच भूमिकेतून दण्डी म्हणतो :–

'न लिंगवचने भिन्ने न हीनाधिकतापि वा ।
उपमादूषणायालं यत्रोद्वेगो न धीमताम् ।। २/५१.

अर्थात्:- 'जी काव्ये वाचताना सहृदयांची मने व्याकुळ होत नाहीत, त्या काव्यातील उपमाने व उपमेये यांच्या लिंग-वचनात विरोध असला किंवा हीनता-अधिकता अशी विषमता असली तरी त्या विसंगति उपमालंकाराचा दोष ठरू शकत नाही.' म्हणजेच काव्याची सरसता केवळ काव्यशास्त्राच्या कसोटीने ठरत नसते, तर **सहृदयांच्या प्रतीतीत जे काव्य व्याघात उत्पन्न करते ते काव्य निकृष्ट होय. उलट, जे काव्य सदोष असूनही सहृदयांची हृदये खुलविते ते सरसच म्हटले पाहिजे.** तात्पर्य, दंडीच्या मते, **विदग्ध सहृदयाचे सुसंस्कृत, अभिरुचिसंपन्न मत हेच काव्याच्या सदसन्निर्णयाचे सर्वोच्च न्यायालय होय.**

(६) काव्यशास्त्राचे सम्यक् ज्ञान अभ्यासू सहृदयास आदर्श काव्यनिर्णेता बनविते तर ज्याचे अंगी उपजत प्रतिभा आहे अशा सुदैवी पुरुषास उत्कृष्ट काव्यनिर्माता बनविते. त्यामुळे ज्यास उत्तम कवि होण्याची महत्त्वाकांक्षा असेल त्याने परिश्रमपूर्वक काव्यशास्त्र अभ्यासिले पाहिजे असा दण्डीचा आदेश आहे. किंबहुना, दण्डीच्या मते केवळ नैसर्गिक प्रतिभेच्या साह्याने सत्काव्यनिर्मिति साधत नाही, तीसाठी व्युत्पत्ति व अभ्यास यांची जोड आवश्य द्यावी लागते. दण्डी म्हणतो :–

नैसर्गिकी च प्रतिभा श्रुतं च बहुनिर्मलम् ।
अमंन्दश्चाभियोगोऽस्याः कारणं काव्यसम्पदः ।।१/१०३

अर्थात् :- "निसर्गसिद्ध प्रतिभाशक्ति, व्याकरण–साहित्य–स्मृति–पुराणादि अनेकविध शास्त्रांचे विशुद्ध व संशयरहित ज्ञान ('– शास्त्राणि पद–वाक्य–प्रमाण –साहित्य–छन्दोऽलंकार–श्रुति–स्मृति–पुराण- इतिहास –आगम –नाट्य–अभिधान- कोश–काम– अर्थ–योग–शास्त्रादि–अ) आणि काव्यरचनेचे अविरत व खूप प्रयत्न, ह्या तीन गोष्टी मिळून काव्यनिर्मितीस कारणीभूत होतात." परंतु, प्रश्न असा निर्माण होतो की, ज्यांना प्रतिभेची नैसर्गिक देणगी लाभलेली नाही, त्यानी नुसते स्वस्थ बसावे काय ? उद्योग केल्याने काही फल पदरात पडणार नाही काय ? ह्या प्रश्नांनाही दंडीने उत्तर दिले असून ते परिश्रमी परंतु प्रतिभावंचित पुरुषास दिलासा देणारे आहे. दण्डी म्हणतोः—

न विद्यते यद्यपि पूर्ववासना-
गुणानुबन्धिप्रतिभानमद्‌भुतम् ।
श्रुतेन यत्नेन च वागुपासिता
ध्रुवं करोत्येव कमप्यनुग्रहम् ।। १।१०४

अर्थात्:- "यद्यपि एखाद्याचे ठायी आश्चर्यावह काव्यनिर्मिति करणारी (अलौकिक-कविताप्रकटीकारेण आश्चर्यावहम्–अ) जन्मांतरींच्या संस्कारांमुळे प्राप्त झालेली (प्राक्तनसंस्कारसंबद्धम्–अ) प्रतिभाशक्ति नसली तरीही (त्याने हताश न होता) शास्त्रानुशीलन करून किंवा काव्यज्ञांकडून उपदेश घेऊन प्रयत्नपूर्वक सरस्वतीची जर उपासना केली तर सरस्वती त्याचे ठायी थोडीतरी काव्यनिर्माणशक्ति अवश्य उत्पन्न करते." दंडीच्या म्हणण्याचा आशय असा की, उत्कृष्ट काव्यनिर्मितीस प्रतिभा, व्युत्पत्ति व अभ्यास ह्या तीनही घटकांच्या 'साहित्या'ची आवश्यकता असते यात मुळीच संशय नाही. तथापि, प्रतिभाहीन पुरुषाने–

'काष्ठात् अग्निर्जायते मथ्यमानात्
भूमिस्तोयं खन्यमाना ददाति ।
सोत्साहानां नास्त्यसाध्यं नराणां
मार्गारब्धाः सर्वयत्नाः फलन्ति ।।'

–हा उपदेश मनी बागवून शास्त्राभ्यासास लागावे म्हणजे थोडीफार काव्यपटुता निश्चित हस्तगत करता येईल. हीच भूमिका घेऊन दण्डी उपदेश करतोः–

'तदस्ततन्द्रैः अनिशं सरस्वती
श्रमादुपास्या खलु कीर्तिमीप्सुभिः ।
कृशे कवित्वेऽपि जनाः कृतश्रमाः
विदग्धगोष्ठीषु विहर्तुमीशते ।।' १/१०५.

अर्थात्– '(सरस्वती ही परिश्रमपूर्वक शास्त्रानुशीलनाने वश होणारी असते) ह्यासाठी कवि किंवा रसिक म्हणून आपल्याला कीर्ति मिळावी असे इच्छिणाऱ्यांनी आळस झाडून देवी सरस्वतीची, खूप परिश्रम घेऊन, सतत, **निश्चयाने** उपासना करावी. (असे केल्याने) ज्याचे ठायी अगदी क्षीण कवित्वाचा नैसर्गिक






अंकुर असतो असे परिश्रमी लोक सहृदयांच्या सभेत ( सन्मानाने ) वावरू शकतात ' ( सहृदयसमाजेषु विहर्तुं सरसतया काव्यरहस्यज्ञत्वेन यथायथं काव्यानि बोद्धुं ईशते क्षमन्ते– अ ). दण्डीचा अभिप्राय असा की, क्षीणप्रतिभ पुरुषांनी मनापासून व कसून सरस्वतीची आराधना करावी, म्हणजे ती प्रसन्न होते व अशा पुरुषांचे ठायी काव्याचे मर्म जाणण्याची व थोडीफार काव्यरचना करण्याचीही शक्ती उत्पन्न होते. अशा पुरुषांना किमान रसिकता लाभते यात शंकाच नाही. आणि मग एखाद्या कविसंमेलनात असे काव्य-पंडित गेले की, तेथे त्यांना संकोचाने वावरावे लागत नाही. काव्याचे उत्तम ज्ञान शास्त्राभ्यासाने झालेले असल्यामुळे ते संमेलनातील कवींची कविता समजू शकतात, तिचे रसास्वादन करू शकतात व त्यामुळे ते इतर रसिकांच्या तसेच काव्य निर्मिणाऱ्या कवींच्याही आदरास पात्र होतात. ( कविसभासु विहर्तुं = विहारं कर्तुं सम्यक् आदरं लब्धुम् – क) थोडक्यात, वाग्देवीची झटून उपासना करणे हे विद्वानांच्या तसेच कवींच्या मेळाव्यात प्रतिष्ठा मिळविण्याचे एक उत्कृष्ट साधन होय, असा दंडीच्या निरूपणाचा मथितार्थ आहे.

(७) शास्त्राध्ययनाविषयींची दंडीची भूमिका जशी समंजस व समतोल आहे तशीच त्याची काव्यदोष-विषयक भूमिकाही समतोल आहे. काव्य यावच्छक्य निर्दोष असावे, कारण काव्यगत एखादा दोषही, शरीरावरील कोडाच्या डागाप्रमाणे, काव्यसौंदर्यास गालबोट लावतो (तदल्पमपि नोपेक्ष्यं काव्ये दुष्टं कथंचन । स्याद्वपुः सुन्दरमपि श्वित्रेणैकेन दुर्भगम् ॥ ' १/७ ) असा आदर्श सांगून दंडीनेही भामहाप्रमाणेच अपार्थ, व्यर्थ, एकार्थ, ससंशय, अपक्रम, शब्दहीन, यतिभ्रष्ट, भिन्नवृत्त, विसन्धिक, देशविरोधि, काल-विरोधि, कलाविरोधि, लोकविरोधि, न्यायविरोधि, आगम-विरोधि हे अत्यन्त परिहार्य दोष म्हणून निरूपिले आहेत ( काव्यादर्श ३/१२५ व १२६ ). काव्यातील जे दोष अतिशय वैरस्यकारक असतात, ज्या दोषांमुळे कवीचे अज्ञान प्रकट होते, ज्या दोषांमुळे काव्य उपहास्य बनते, ज्या दोषांमुळे काव्यसौंदर्य नाश पावते, त्यांनाच दोष म्हणावे, उगीच शास्त्रीय कीस काढीत बसू नये, ही दण्डीची स्पृह्य भूमिका आहे. त्याला ' पंतोजी'ची वृत्ति आवडत नाही हे त्याच्या पुढील उद्‌गारावरून स्पष्टपणे जाणवते:–

> प्रतिज्ञाहेतुदृष्टान्तहानिर्दोषो न वेत्यसौ ।
> विचारः कर्कशः प्रायः तेनालीढेन किं फलम् ॥
> ३/१२७

अर्थात्:– ' प्रतिज्ञा ( = साध्यनिर्देश ), हेतु ( साध्यसाधन ) व दृष्टान्त ( प्रसिद्धोदाहरणोपन्यास ) यांची हानि हा दोष समजावयाचा की नाही, हा विचारच प्रायः रूक्ष आहे. तेव्हा त्याचा विचार करण्यात काय हशील ? ' दंडीचा अभिप्राय असा की, प्रतिज्ञाहीनत्व, हेतुहीनत्व व दृष्टान्तहीनत्व हे दोष न्याय-शास्त्रात सांगितलेले आहेत हे खरे, तथापि त्यांचा विचार काव्यचर्चेत करण्याचे काय प्रयोजन आहे ? ( प्रतिज्ञा-हीनत्वादयो हि दोषाः शास्त्रीयविचाररूपे शास्त्रार्थे समधिकं उपयुज्यन्ते, न पुनः सरसकाव्यचिन्तने इति तद्विचारो निष्फलान्मयात्रोपेक्षितः इति भावः –अ) काव्य म्हणजे काही शास्त्र नव्हे, त्यामुळे जी चर्चा शास्त्रास ग्राह्य असते ती काव्यास असण्याचे कारणच नाही. **काव्याकडे काव्यदृष्टीने पाहावे, शास्त्रदृष्टीने पाहू नये.** आणि पुनः, जे दोष स्वतःच आस्वादकांस जाणवतात, तेवढेच दोष मानावेत. साहजिकच अशा स्वतःप्रतीत होणाऱ्या दोषांची लंबीचौडी चर्चा काय कामाची ? ( वैरस्यजनकत्वेन दोषाणां परिज्ञानं स्वतः एव बोद्धृनां संभवति, तदर्थं च ग्रंथपल्लवनं अनुचितम् । –व; दोषपदार्थः स च स्वतः एव प्रतीयते – क ). जसे काव्यदोषांकडे काव्यदृष्टीने बघणे आवश्यक आहे, तसेच सगळेच दोष सर्वथैव त्याज्य असतात, ही विचारसरणीही प्रामादिक आहे, असे दंडीचे मत आहे. पुनरुक्त दोषाचे विवेचन करिताना तो म्हणतो :–

> अनुकंपाद्यतिशयो यदि कश्चित् वक्ष्यते ।
> न दोषः पुनरुक्तोऽपि प्रत्युत इयं अलंक्रिया ॥
> ( ३।१३७ )

अर्थात्– ' जर एखाद्या काव्यात अनुकंपादि भाव-नांची उत्कटता वर्णावयाची असेल तर तेथे शब्दाची वा अर्थाची पुनरुक्ति दूषणीय ठरत नाही तर उलट भूष-णीय ठरते' आपल्या विधानाच्या पुष्ट्यर्थ दण्डीने 'हन्यते सा वरारोहा स्मरेणाकाण्डवैरिणा । हन्यते चारुसर्वांगी हन्यते मंजुभाषिणी ॥ ' ( ३/१३८) हे उदाहरण देऊन





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

त्यातील ' हन्यते ' शब्दाची पुनरुक्ति नायिकेविषयींच्या अपार सहानुभूतीचाच कसा परिपोष करते ते दर्शविले आहे. ह्यावरून दंडीने काव्यदोषांचा किती सहृदयतेने व सूक्ष्म दृष्टीने विचार केला होता, ते स्पष्ट होते. दण्डीच्या ह्या सूक्ष्म काव्यमर्मज्ञ दृष्टीचे आणखी एक उदाहरण अवलोकून हा दोषविचार संपवू. ' आधूत-केशरो हस्ती तीक्ष्णशृंगः तुरंगमः। गुरुसारोऽयमेरंडो निःसारः खदिरद्रुमः ॥ ' ( ३/१७२ ) हे उदाहरण देऊन दण्डी प्रतिपादितो की,

इति लौकिक एवायं विरोधः सर्वगर्हितः । ( ३।१७३ )

' वरील पद्यात जे वर्णन आले आहे, त्यात लोक-प्रसिद्ध अर्थाचाच विरोध आहे. आणि त्यामुळे सर्वच लोक असला दोष त्याज्य समजतात. ' दण्डीचा रोख असा की, एकवेळ कवीचे देशविषयक वा कालविषयक अज्ञान काव्यात प्रकट झाले तरी त्यास फारशी हरकत नाही, पण लोकप्रसिद्ध अशा गोष्टीविषयींचे कवीचे अज्ञान जर काव्यात प्रकट झाले तर कवीचा उपहास तर होतोच, पण शिवाय आस्वादकांच्या रसास्वादात विक्षेप येतो. ( देशादिविरोधापेक्षया लोकविरुद्धवर्णनं वर्णयितुः नितान्तं अनभिज्ञत्वं ख्यापयति तत्र सर्वथा कविना सावधानेन भवितव्यं इति भावः । –ब; देशादि-विरोधापेक्षया सर्वथा हेयोऽयं लोकविरोधः कवयितुः अत्यन्ताज्ञत्व–प्रकाशनादिति भावः– क ). जे **वर्णन काव्याचे सौभाग्य ( ३/१५१ ) उद्ध्वस्त करते ते दूषणीय, जे काव्यसौन्दर्याचे संरक्षण व संवर्धन करते ते भूषणीय अशी दंडीची एतद्विषयक भूमिका आहे.**

( ८ ) दण्डीची हीच सौन्दर्यपूजक व विशुद्ध साहित्यदृष्टी तत्कृत महाकाव्यलक्षणातही जाणवते. इतर अनेक साहित्यशास्त्रज्ञांप्रमाणे दंडीनेही, महाकाव्य सर्गबद्ध असावे, त्यातील कथानक इतिहासप्रसिद्ध असावे, त्यात वर्णिलेली हकीकत सत्य असावी, कल्पित नसावी, त्यात नगर-सागर-पर्वतादींची वर्णने असावीत, त्यात विप्रलंभशृंगाराचे, विवाहाचे, पुत्र-जन्मादींचे वर्णन असावे, महाकाव्य सालंकृत असावे, त्यातील वृत्तयोजना श्रवणसुभग असावी असे काव्यच कल्पान्तापर्यंत टिकून राहाते कारण असे लोकरंजक काव्य सहृदय रसिक आपण होऊनच पठनपाठनादि परंपरेने जतन करितात ( यतः तादृशकाव्यस्य पठनपाठनादिसंप्रदायद्वारा सहृदयैः अवश्यं रक्षा क्रियते, अतः एव कल्पान्तरस्थायि क ), हेच महाकाव्य-लक्षण प्रथम परिच्छेदाच्या १४ ते १९ श्लोकात सांगितले आहे. तथापि, काव्यगत वर्णनात कोणता क्रम पाळावा ते निरूपिताना दण्डीने उच्च कलादृष्टि दाखविली आहे. तो म्हणतोः–

> गुणतः प्रागुपन्यस्य नायकं तेन विद्विषाम् ।
> निराकरणमित्येष मार्गः प्रकृतिसुन्दरः ॥
> वंशवीर्यश्रुतादीनि वर्णयित्वा रिपोरपि ।
> तज्जयान्नायकोत्कर्षवर्णनं च धिनोति नः ॥
> १/२१,२२.

अर्थात् :– ' प्रथमतः नायकाच्या कुलशीलादि गुणांचे वर्णन करून मग त्याने शत्रूंचे निराकरण केल्याचे दाखवावे. वर्णनाची ही रीत स्वभावमनोरम होय. ( १/२१ ). शत्रूचेही कुलशील, विद्वत्ता, पराक्रम आदींचे वर्णन करावे. पण त्याचा जय झाल्याचे वर्णन आम्हास तितके प्रिय नाही; तर नायकाचा अभ्युदय झाल्याचे वर्णन आम्हास अधिक संतोषदायक वाटते. ' दंडीचे इंगित असे की, काव्यात प्रथमतः नायकाचे गुण वर्णन केल्याने तो वाचकांच्या हृदयात स्थिरपद होतो, त्यांच्या सहानुभूतीस वा आदरास पात्र होतो. आणि मग त्या नायकाने शत्रूंचा निःपात केल्याचे वर्णन वाचून रसिकास क्रमानुसारी काव्य-रचनेचा आस्वाद घेतल्याचाही आनंद होतो आणि शिवाय त्याचे मनावर बोधाचाही यथायोग्य ठसा उमटतो ( काव्यस्य प्रधानं उद्देश्यं सदुपदेशः, सच सत्पुरुषाभ्युदयासत्पुरुषविनिपातप्रतिपादनेन एव प्रकटी-कृतो भवति, तदर्थं तयोः क्रमशो वर्णनं अपेक्षितं भवति ......तेनैव वर्णनेन रामादिवत्प्रवर्तितव्यं न रावणादिवत् इति सदुपदेशो गृहीतो भवति– अ ). आता काव्यात नायकाचा उत्कर्ष अभीष्ट असला तरी प्रतिनायकाची उपेक्षा इष्ट नसते. कारण शूरवीर नायकाने त्याच्याच-सारख्या किंबहुना काकणभर त्याच्याहून सरस अशा प्रतिनायकाचे निराकरण केल्याचे वाचूनच वाचकांना चमत्कृतिजनित आनंदाचा लाभ मिळावयाचा असतो. साहित्यगत सौन्दर्याच्या ह्या नियमावर लक्ष ठेवूनच दंडी प्रतिपादितो की, महाकवीने नायकाच्या शत्रूच्या








अंगच्या कुलशीलवीर्यादि गुणांचेही सविस्तर वर्णन करावे. त्याबाबतीत कोणत्याही पूर्वग्रह बाळगू नये. प्रतिनायकाचे गुणही वाचकास प्रतीत होणे जरूरीचे असते. आणि मग अशा गुणशाली व बलाढ्य शत्रूचा नायकाने पराजय केल्याचे पाहून नायकाच्या सामर्थ्याविषयींचा वाचकांचा आदरही दुणावतो, शिवाय प्रतिनायकाचे, सुरुवातीस भरघोस वर्णन केल्यावर, नायकाच्या गुणादींचे त्याहूनही अधिक प्रभावी वर्णन करताना महाकवीला आपली प्रतिभा पणाला लावावी लागते, आपले सर्व कौशल्य प्रकट करावे लागते. आणि अशाप्रकारे प्रतिनायकवर्णनानंतर महाकवीने साधलेले अधिक प्रभावी असे नायकवर्णन रसिकाने वाचले की, त्याला कविप्रतिभाचमत्काराविषयी अत्यादर वाटू लागतो. ( नायकवर्णनात् प्राक् प्रतिनायकवंशवीर्यश्रुतादीनी वर्णयित्वा तत्पश्चात् तादृशस्यापि प्रतिनायकस्य नायकद्वारोच्छेदो वर्ण्यमानो नायकस्यैव सारवत्तातिशयं पुष्णातीति पक्षोऽयमस्मान् सविशेषं आनन्दयति। अत्र प्रकारे वस्तुवृत्तस्यानपलापो भवतीति, प्रतिनायकवर्णनपूर्वकनायकवर्णनेन कविप्रतिभाचमत्कारश्च भवति स्फुट इति च बोध्यम् – अ ) वरील विवेचनावरून काव्यशिल्पाच्या सौंदर्याविषयी दण्डीची दृष्टि किती चोखंदळ होती, ते स्पष्ट होते. त्याचा हा चोखंदळपणा 'भाविक' अलंकाराच्या निरूपणातही दिसून येतो.

'तद्भाविकमिति प्राहुः प्रबन्धविषयं गुणम् ।
भावः कवेरभिप्रायः काव्येष्वासिद्धि संस्थितः ॥
२/३६४

परस्परोपकारित्वं सर्वेषां वस्तुपर्वणाम् ।
विशेषणानां व्यर्थानामक्रियास्थानवर्णना ॥
२/३६५

व्यक्तिरुक्तिक्रमबलाद्गंभीरस्यापि वस्तुनः ।
भावायत्तीमदं सर्वं इति तद्भाविकं विदुः ॥
२/३६६

अर्थात्– " (महाकाव्यनाटकाख्यायिकादि ) प्रदीर्घ रचनात असणारा जो ( चमत्कारजनक ) गुणविशेष त्यास विद्वान् 'भाविक' असे म्हणतात. **भाव म्हणजे कवीचा अभिप्राय.** तो काव्यात सुरुवातीपासून अखेरपर्यंत टिकतो. काव्यगत आधिकारिक(=मुख्य कथानक ) व प्राकरणिक ( उपकथानके ) ही परस्पर-पोषक असली पाहिजेत. ( मुख्यार्थास ) अनुपयोगी विशेषणांचा काव्यात समावेश करू नये. तसेच प्रकृतास उपयुक्त अशाच विषयांचे कवीने वर्णन करावे. पदरचनाक्रमाच्या सामर्थ्यामुळे निगूढ विषयाची अभिव्यक्ति कवीने करावी. ह्या सर्व गोष्टी कवीच्या अभिप्रायाधीन असल्यामुळे ह्या अलंकारास भाविक म्हणतात." महाकाव्ये, नाटके, आख्यायिका इत्यादी रचना प्रदीर्घ असतात. त्यांची रचना करण्यापूर्वी कवीने एक उद्दिष्ट ( कवेरभिप्रायः ) मनाशी निश्चित केलेले असते. आणि त्या उद्दिष्टानुसारच काव्यातील सर्व वर्णनांची व प्रसंगांची कवीने आखणी व मांडणी करावयास हवी. तसे केले तरच काव्यात एकसूत्रता, एकरूपता निर्माण होईल, नहून काव्य रचनादृष्ट्या एकसंध वाटणार नाही. आता रामायणादींसारख्या दीर्घ काव्यात एक प्रमुख कथानक असून इतर अनेक उपकथानके असतात. ती सारी प्रमुख कथानकाशी संबद्ध हवीत ( तेषां वस्तुपर्वणां सर्वेषां परस्परोपकारित्वं अन्योन्यपोषकत्वम्– अ ) इतकेच नव्हे तर मुख्य कथानकास उठाव देणे एवढेच त्यांचे उद्दिष्ट असले पाहिजे ( महाकाव्यादौ करितुरगपुरगिरिप्रभृतिवर्णनमपि साक्षात् परम्परया वा प्रधानोपकारे पर्यवस्यतीति बोध्यम् । – ब) मुख्य विषयास पोषक, उपकारक अशीच वर्णने काव्यात असावीत, मुख्य विषयाचे पोषण हेच त्यांचे उद्दिष्ट असावे. आणि काव्यगत अर्थ किती का गंभीर वा गूढ असेना, तो प्रयुक्त पदांच्या प्रतिपादकताबलानेच अभिव्यक्त व्हावयास हवा. तो जाणून घेण्यासाठी रसिकास अध्याहारादि खटाटोप करावा लागता कामा नये. आणि **असा निगूढ कविभावसंबद्धच असला पाहिजे.** थोडक्यात, **काव्यातील ऐक्याचा ( unity ) दण्डीने किती सूक्ष्म बुद्धीने विचार केला होता, त्याचा प्रत्यय येतो.**

( ९ ) काव्य-महाकाव्यांची रचना कवीच्या अभिरुचीनुसार व प्रतिभाबलानुसार होत असते. त्यामुळे सर्वच महाकवींनी एकाच विषयावर यद्यपि काव्ये लिहिली, तथापि प्रत्येकाची रचना वेगळीच होत असते. घटना-प्रसंगाची मांडणी करण्याची पद्धति बदलते. तात्पर्य, प्रत्येक कवीनुसार लेखनशैली बदलते, जितके कवी तितक्या शैली, हा विचारही दण्डीने स्पष्टपणे, पुढील शब्दात, मांडलेला आहे.








' अस्त्यनेको गिरां मार्गः सूक्ष्मभेदः परस्परम् ।
तत्र वैदर्भगौडीयौ वर्ण्येते प्रस्फुटान्तरौ ।। १ /४०

' वाणीच्या रचनापद्धति अनेक असल्याचे पूर्वसूरींच्या ग्रंथात सांगितले आहे ( अस्तीति प्राचां ग्रन्थेषु निरूपितः इति शेषः- ब ). त्या पद्धतींमधील परस्परभेद अत्यन्त सूक्ष्म आहे, स्थूलदृष्टीस दिसण्यासारखा नाही ( सूक्ष्मभेदः स्थूलबुद्धिजनावेद्यपार्थक्यः केवलं परिपक्वबुद्धिविभवमात्रावगम्यपार्थक्यः –अ ). पैकी ज्यातील भेद स्पष्ट आहे अशा वैदर्भ व गौडीय ह्या दोन मार्गांचे येथे निरूपण केले जात आहे. ' परस्परविलक्षण रचनापद्धति किंवा शैली अनेक असतात, त्यांची परिगणना करता येण्यासारखी नसते हाच विचार दंडीने आणखीही एके ठिकाणी एका सुन्दर दृष्टान्ताच्या साह्याने मांडला आहे. तो म्हणतो :—

इति मार्गद्वयं भिन्नं तत्स्वरूपनिरूपणात् ।
तद्भेदास्तु न शक्यन्ते वक्तुं प्रतिकविस्थिताः ।।१/१०१
इक्षुक्षीरगुडादीनां माधुर्यस्यान्तरं महत् ।
तथापि न तदाख्यातुं सरस्वत्यापि शक्यते ।। १/१०२

अर्थात् :– ' अशा प्रकारे गौडीय व वैदर्भ हे दोन मार्ग, त्यांच्या स्वरुपनिरूपणावरून भिन्न आहेत, हे स्पष्ट झाले. त्यांचे उपोपभेद प्रत्येक कवीगणिक भिन्न असल्यामुळे त्यांचे निरूपण करणे शक्य नाही. असे पाहा की ऊस, खीर व गूळ हे सर्वच पदार्थ गोड हे खरे, पण त्यांपैकी प्रत्येकाची गोडी वेगळी असते. आणि तो वेगळेपणा इतका मोठा असतो की साक्षात् सरस्वतीलाही त्याचे वर्णन करणे अशक्य आहे. ( मग पामरांची काय कथा ? ) ' तात्पर्य, **जितक्या व्यक्ति तितक्या रीति हे आधुनिकांना शिरोधार्य असलेले साहित्यतत्त्वच जणू दण्डीने येथे मांडले आहे.**

(१०) रीतींच्या अनेकत्वाविषयी ज्याप्रमाणे दण्डीने वास्तविक भूमिका घेतली आहे, तशीच भूमिका त्याने अलंकारांविषयीही पत्करली आहे. तो म्हणतो :–

काव्यशोभाकरान् धर्मानलंकारान् प्रचक्षते ।
ते चाद्यापि विकल्पान्ते कस्तान् कार्त्स्न्येन वक्ष्यति ।। २।१

अर्थात् :– ' ( इष्टार्थव्यवच्छिन्नापदावलीरूप ) काव्याचे सौंदर्य संपादणाऱ्या धर्मांना अलंकार असे म्हणतात. कवि अलंकार विविध रूपांनी कल्पितात, त्यामुळे त्यांचे साकल्याने वर्णन कोण करूं शकणार ?' दण्डीचा आशय असा की, उक्तिवैचित्र्य म्हणजे अलंकार. आता उक्तीत हे जे चमत्कारजनकत्व निर्माण होते ते केवळ कल्पनेमुळेच होय. कवि कल्पनाशक्तीच्या साह्याने निरनिराळी चमत्कृतिपूर्ण विधाने करतो. आता कल्पनेचा जन्म होतो कवीच्या बुद्धीतून आणि पुनः, प्रत्येक कवीची बुद्धि वेगळी असल्यामुळे त्याला वेगळ्या कल्पना सुचतात. म्हणजे, कवींच्या भिन्नतेमुळे कल्पनांची भिन्नता उत्पन्न होते, कल्पनांच्या भिन्नतेमुळे उक्तिवैचित्र्याची भिन्नता जन्मास येते आणि उक्तिवैचित्र्यभिन्नतेमुळे अलंकारांची भिन्नता, अनेकता व विविधता निर्माण होते. ( उक्तिवैचित्र्यं एव अलंकाराः, तच्च कल्पनैकमूलम्, कल्पनाश्च पुरुषबुद्धिप्रभवाः, पुरुषाश्चानन्ताः– क ). तात्पर्य, **कवीच्या कल्पनाशक्तीला मर्यादा नसल्यामुळे अलंकारांची म्हणजेच काव्यसौंदर्याचा परिपोष करणाऱ्या प्रसाधनांची अनंतता अपरिहार्यपणे निर्माण होते.**

---





अनुक्रमणिका






प्रा. डॉ. र. चिं. बडवे

# समाजवाद पूर्णांशाने मृगजळ आहे !

नवभारताच्या जुलै ६५च्या अंकात डॉ. मो. वि. पटवर्धन यानी ' समाजवादाचे मृगजळ व भारत ' या मथळयाचा लेख लिहून विचारांना दिलेली चालना स्वागतार्ह आहे. कोणत्याही क्षेत्रात प्रत्यक्षानुभवाच्या मागोल्याने मूलभूत स्वरूपाचा विचार करण्याची कुवत आपल्या समाजात नहिवत असल्याने ' मूढः परप्रत्ययेनय बुद्धिः ' या न्यायाने परकीयांची बौद्धिक गुलामगिरी उत्पन्न होणे स्वाभाविकच मानले पाहिजे. यामुळे अर्थातच स्वतंत्र विचार करणाऱ्यांची समाजात कदर होत नाही व त्याना जरूर ते उत्तेजन मिळत नाही ही खेदाची गोष्ट होय.

## डॉ. पटवर्धनांनी केलेली उथळ चिकित्सा

बुद्धिप्रामाण्याच्या निकषावर घासून पहाता मार्क्सप्रणीत समाजवाद अशास्त्रीय व अशक्य ठरतो. हे श्री. पटवर्धनांनी स्पष्ट केलेच आहे. यालाच पूरक म्हणून मला असे म्हणावयाचे आहे की आर्थिक, सामाजिक, राजकीय इ. क्षेत्रातील विषमता संपूर्णपणे नष्ट करून वर्गविरहित व शासनविरहित समाज निर्माण करण्याचे समाजवादी ध्येय मानसशास्त्रीय दृष्टीनेही मृगजळवतच आहे. विषमता ( असमानता ) हा निसर्गाचाच मूलभूत स्वरूपाचा नियम आहे. कोणत्याही दोन व्यक्तीत, अगदी जुळया भावंडातही, शारीरिक वा मानसिक शक्तींबाबत संपूर्ण समानता कधीही दिसून येत नाही व एकंदर मानवी समाजाचा विचार केला तर माणसामाणसामध्ये असमानतेचे प्रमाण मोठ्या प्रमाणावर दिसून येते. याच्या बुडाशीही निसर्गाची ही विषमता हेच मुख्य कारण होय. विषमता मानवी समाजापुरतीच मर्यादित आहे असेही नाही. सर्व सजीव सृष्टीला तिने व्यापले आहे. पशुपक्षी व वनस्पतींमध्येही ती तितक्याच प्रकर्षाने दिसून येते. म्हणूनच तर गाय, घोडा, पोपट, कुत्रा इत्यादि प्राणी अथवा तांदूळ, गहू, फळे इ. विकत घेताना त्या त्या वस्तु चांगल्या दर्जाच्या वा जातीच्या आहेत किंवा नाहीत हे पारखून घेण्याची आपण कोशीस करतो. माणूस ही निसर्गाचीच निर्मीती असल्याने तो निसर्गाच्या या मूलभूत नियमाचा भंग करू शकेल अशी स्थिति सध्यातरी नाही. विज्ञानाच्या घोडदौडीत भविष्यकाळात काय होईल ते कोणी सांगावे ? म्हणून नवीन जन्मास येणाऱ्या प्रत्येक अपत्यात जन्मजात गुणांच्या बाबतीत सारखेपणा आणण्याची गुरुकिल्ली जोपर्यंत मनुष्याला प्राप्त झाली नाही तोपर्यंत समाजात कोणत्याना कोणत्या स्वरूपात विषमता ही रहाणारच हे पूर्णपणे लक्षात घेऊनच त्याने आपापली ध्येये निश्चित करणे जरूर आहे. याकडे दुर्लक्ष करून ठरविलेली ध्येये मृगजळवत ठरली तर नवल नाही. हे सर्व मान्य केल्यानंतर मात्र मला असे मुद्दाम स्पष्ट करावेसे वाटते की विषमतेविषयीची ही चिकित्सा अगदीच वरवरच्या स्वरूपाची आहे. त्यात मूलभूत मुद्याकडे दुर्लक्ष झालेले आहे. श्री. डॉ. पटवर्धन यांचाही लेख या दोषापासून मुक्त नाही. त्यात नीरक्षीर विवेकाची प्रचीती येत नाही व म्हणूनच त्यांनी काढलेले निष्कर्ष स्वीकारताना सावधगिरीची जरूर आहे. कसे तेच या लेखाद्वारे पहावयाचे आहे.

## काही विषमता समाजनिर्मितच आहे व ती नष्ट करण्याचे प्रयत्न ' मृगजळ ' नव्हेत

प्रश्न हा आहे की विचारवंत माणसे या उघड दिसणाऱ्या वास्तवतेकडे पाठ फिरवून कल्पनारम्य वाटणारी ध्येये निश्चित करण्यास व ती साध्य करण्यासाठी जिवाचा होम करण्यास कशी काय प्रवृत्त होतात व अशा ध्येयांच्या मागे इतरेजन का धाव घेतात ? सामान्य जनापुरते तरी याचे उत्तर असे संभवते की निसर्ग अथवा वास्तववादी जग मनुष्याला कोणत्याही ध्येयाच्या बाबतीत निरपवाद आनंद अथवा समाधान देण्याच्या कामात नेहमीच कुचराई करीत असल्याने निदान कल्पनासाम्राज्यात तरी ती साध्य असल्याचा आनंद लुटावा ही माणसाची सामान्य वृत्ति असते. यामुळेच प्रत्यक्षतः साध्य–असाध्याचा विचार करण्या-










अनुक्रमणिका

ऱ्या भानगडीत तो सहसा पडत नाही. न जाणो, सुखद वाटणारे एखादे ध्येय असाध्य ठरले तर त्या ध्येयाभोवती मानसिक गुंजारव करून मिळणाऱ्या आनंदासही पारखे होण्याची वेळ यायची. बहुसंख्य लोकांना असा विचार करण्याची तर कुवतच नसते. हेही एक कारण असण्याचा संभव आहे. यामुळेच अर्थहीन ध्येये सामान्य लोकांसमोर ठेवून तद्वारा स्वार्थ साधण्याची संधि स्वार्थसाधूंना मिळू शकते हे लक्षात घेता आपली समस्या अशी उरते की विचारवंत व बुद्धिमान लोकांचे काय ? मार्क्सपुरता विचार करता प्रश्न उत्पन्न होतो की मानवजातीच्या समोर असाध्य ध्येये ठेवून त्यासाठी चंदनाप्रमाणे झिजून जीवनाचे एका अर्थाने हौतात्म्य पत्करणाऱ्या या महान विभूतीचे क्रांतिकारक विचार व कार्य निरुपयोगी व निष्फळच समजावयाचे की काय ? त्याच्यायोगे मानवजातीच्या जीवनाला अधिकाधिक समृद्धता प्राप्त होण्याची शक्यता बिलकुल नाही असेच समजून आपण आपले व्यवहार चालू ठेवावयाचे की काय ? माझ्या दृष्टीने तरी या प्रश्नांची उत्तरे ठामपणे 'नाही' अशी आहेत. कसे ते आता पाहू.

'सामाजिक विषमता' हा शब्दप्रयोग अनेक वेळा अनेकजण करीत असताना. कित्येक पुढारी या शब्दाच्या भांडवलावरच आपले पुढारीपण टिकविण्याचा प्रयत्न करीत असल्याचेही आढळून येते. परंतु या शब्दाची फोड करून त्याचा अर्थ निश्चित करण्याचा प्रयत्न फारसा होत असल्याचे दिसून येत नाही व त्यामुळेच तत्संबंधीच्या विचारात गोंधळ माजतो. म्हणून विषमतेचे पूर्ण स्वरूप काय आहे हे प्रथम स्पष्टपणे लक्षात घेणे अवश्य आहे. आपण सुरवातीला पाहिल्याप्रमाणे विषमता हा नैसर्गिक नियम असला तरी समाजात सर्वत्र व तीव्र स्वरूपात दिसून येणारी विषमता पण सर्वस्वी निसर्गनिर्मित आहे की काय याचाही विचार व्हावयास हवा. तो करता असे आढळून येते की ही विषमता काही अंशी निसर्गनिर्मित व काही अंशी मानव अथवा समाजनिर्मित आहे. उदाहरणार्थ, निरनिराळ्या व्यक्तीगत दिसून येणारी नाकाची ठेवण, कातडीचा रंग, शरीराची ठेवण, बुद्धी, भावनाविवशता, कल्पनाशक्ती, स्मृतिशक्ती इ. बाबतीतील विषमता नैसर्गिक आहे व त्यामुळे व्यक्तीच्या जीवनात पडणारे फरक हेही स्वाभाविकपणेच नैसर्गिक होत. खरे पाहाता ही विषमता नसून असमानता आहे असे म्हणणे अधिक युक्त होईल. या असमानतेची धार मानवी प्रयत्नानी थोडीफार बोथट करणे शक्य असले तरी ती मूलतः अपरिवर्तनीय होय यात शंका नाही. परंतु समाजात दिसून येणारी सर्वच विषमता या निसर्गनिर्मित असमानतेतूनच जन्म पावते हे मान्य करणे कठीण आहे. उदाहरणार्थ, जन्मजात जातिभेदावर आधारलेली उच्चनीचता अथवा स्पृश्यास्पृश्यता जवळजवळ सारखेच शारीरिक व मानसिक गुण असलेल्या व्यक्तीपैकी काही उच्चपदावर व काही नीच पदावर, सारखेच श्रम करण्याची कुवत असलेल्या व करणाऱ्या व्यक्तींच्या उत्पन्नातील डोळ्यावर येण्याइतकी मोठी तफावत, केवळ बापजाद्यांच्या संपन्नतेमुळे अथवा असंपन्नतेमुळे संततीच्या जीवनात उत्पन्न होणारी विषमता, सत्तेचा मद, वशिलेबाजी, शासकीय भ्रष्टाचार, काळाबाजार, सत्यासत्याची क्षिती झुगारून देण्याची हिंमत इ. मुळे उत्पन्न होणारी विषमता, हे किंवा असेच अनेक प्रकार निसर्गनिर्मित आहेत असे समजणे म्हणजे समाजाच्या विकृत अवस्थेवर पडदा टाकून स्वतःची व इतरांची वंचना करणेच होय. या प्रकारची विषमता हे समाजाचे अपत्य आहे. (मग समाजाला त्याची जाणीव असो वा नसो) व समाजाने मनात आणले तर ती नष्ट करणे अगदी शक्य आहे. जो समाज कृत्रिम विषमता उत्पन्न करू शकतो तोच ती नष्टही करू शकेल याबद्दल संशय घेण्यास कोणतेही योग्य कारण दिसत नाही. नैसर्गिक भिन्नत्वामुळे उत्पन्न होणारी विषमता व समाजाची मानवकृत रचना व नियम यामुळे उत्पन्न होणारी विषमता मूलतःच भिन्न असल्याने डोळ्यावर कातडे ओढून दोन्हीची गल्लत करणे काही काळ कदाचित शक्य झाले तरी अनंतकाळपर्यंत ते शक्य होईल हा विचार पूर्णतः भ्रामक होय. समाजाच्या ज्या भागास विषमतेची आच लागते तो भाग केव्हाना केव्हा तरी बंड करून उठल्याशिवाय रहाणार नाही. अशी बंडे मोडून काढण्यात प्रस्थापित हितसंबंधीयांना काही काळ यश आल्याचे भासले तरी ते यश चिरस्वरूपी ठरण्याची सुतराम शक्यता नाही. नव्हे तसे होणे हेच मनुष्यस्वभावाचा विचार करता, अनैसर्गिक ठरेल. या दृष्टीकोनातून विचार करता समाजनिर्मित








अनुक्रमणिका

विषमता नष्ट करण्याचे ध्येय पुढे ठेवून ते साध्य करण्यासाठी बद्ध परिकर होणे म्हणजे मृगजळाच्या मागे लागणे नसून तो फक्त हक्कसंरक्षणाच्या व अन्याय-प्रतिकाराच्या नैसर्गिक वृत्तीचा आविष्कार होय हे या त्रोटक विवेचनावरून स्पष्ट होईल. स्वतःच्या रक्ताचे पाणी करून दलित व पीडित समाजाला समतेची शिकवण देणारे मार्क्ससारखे द्रष्टे खरे पहाता माणसातील अन्याय–प्रतिकाराच्या या वृत्तीला चेतवीत असतात. सामान्य जनता बिचारी दैववादी व गतानुगतिक असते. पिढ्यान् पिढ्या पीडित अवस्थेत काढल्याने त्या स्थितीलाच नैसर्गिक मानण्याची तिची वृत्ति बनते. स्वतःच्या हक्कांची व ते पायदळी तुडविणाऱ्या समाजकृत अन्यायांची जाणीवही तिला बहुधा नसते मग प्रतिकाराची तर गोष्टच सोडा. काही व्यक्तींना जाणीव झालीच तरी ते अन्याय दूर कसे करून घ्यावेत हे त्यांच्या लक्षात येत नाही. इतरांची साथ मिळेल की नाही हीही शंका मनात असते. साहजिकपणेच अन्याय पिढ्यान्‌पिढ्या चालू राहातात. परंतु अशा समाजात एकादा मार्क्स अथवा आंबेडकरासारखा तेजस्वी तारा उगवला तर तो आपल्या विचारसरणीने व कर्तृत्वाने समाजनिर्मित विषमतारूपी अन्यायास तीव्रतेने व पोटतिडकीने वाचा फोडतो, इतकेच नव्हे तर तो नष्ट करण्यासाठी समाजाच्या डोळयात चरचरित अंजन घालून त्यात स्वहक्क संपादनार्थ संघटित करण्याचे कार्य आपल्या शिरावर घेतो, त्यासाठी कोणतेही कष्ट वा त्याग करण्याचे बाकी ठेवीत नाही. हे अंजन म्हणजेच समता अथवा अशाच एकाद्या उच्च ध्येयाची शिकवण होय. हे ध्येय जितके उच्च तितके अंजन अधिक चरचरीत बनते व समाजही मोठ्या प्रमाणात संघटित बनतो. अशा उच्च ध्येयात अनेक वेळा असाध्य अशा घटकांची सरमिसळ होत असली तरी त्यामुळे मूळ कार्याचे महत्व कमी होत नाही अथवा त्याला बाधही येण्याचे कारण नाही. कालौघात असाध्य भाग बाजूला पडेल व ' साध्य ' भागाचा मार्ग समाज चोखाळू लागेल. म्हणून असाध्य भागाची मृगजळ म्हणून बोळवण करणे अगदी रास्त असले तरी या सुक्याबरोबर साध्याचे ओलेही जाळून टाकण्याचा प्रयत्न व्यर्थ होय. यामुळेच मार्क्सच्या विचारसरणीतील पूर्ण समानता, शासनविरहित समाज, शोषणहीन समाज वगैरे भाग मृगजळवत असला तरी त्यामुळे त्यामागील दृष्टिकोनच चुकीचा अतएव त्याज्य आहे असे म्हणणे कोणत्याही परिस्थितीत समर्थनीय ठरणार नाही व ते कालक्रमात टिकणारही नाही.

## मार्क्सनंतर समाजात झालेली स्थित्यंतरे

मार्क्सनंतर मार्क्सवादाच्या आश्रयाने व मागोव्याने समाजात जी स्थित्यंतरे झाली व अजूनही होत आहेत त्याकडे नुसती ओझरती नजर टाकली तरी याची सत्यता प्रतीत होऊ शकेल. औद्योगिक क्रांतीच्या सुरवातीच्या नावात समाज पूर्णांशाने भांडवलशाही प्रधान होता. कारखाने तर भांडवलदारांच्या खाजगी मालकीचे होतेच. शिवाय कारखानदारांवर कोणाचेही कसल्याही प्रकारचे नियंत्रण नव्हते; इतकेच नवे तर असे नियंत्रण असणे हे तत्कालीन अर्थशास्त्रीय सिद्धांताच्या विरुद्ध होते. मजुरांचा पगार व तो नियमित मिळण्याची खात्री, त्यांची कामावरील सुरक्षितता व कामाची शाश्वती, त्यांना मिळणारी रजा, अधिकाऱ्यांची त्यांच्याशी होणारी वर्तणूक, वृद्धापकाळातील निर्वाहाची सोय, कामाचे तास इत्यादि सर्वच बाबतीत त्यांची स्थिती अतिशय दयनीय होती. त्यांना काहीही हक्क नव्हते, ते पूर्ण दास्यत्वाचे जिणे जगत होते. त्यांच्या जीवनाची जणू किंमतच नव्हती. ' मुकी बिचारी कुणी हाका ' हेच त्यांचे नशीब होते. लहानथोर हा भेद करण्याचीही प्रथा नव्हती. अगदी कोवळया कोवळया मुलांनाही गुराढोरांप्रमाणे कामास जुंपले जाई व वागणूकही तशीच मिळे. थोडक्यात म्हणजे कामकऱ्यांचे सर्वांगीण जीवन भांडवलवाल्यांच्या निवळ मर्जीवर अवलंबून असे. याच काळात मार्क्सने ' जादा नफ्याचा सिद्धांत ' मांडून भांडवलशाहीचे सत्यस्वरूप उघडकीस आणले व मजुरांवर होणाऱ्या अन्यायास फारच प्रभावीपणाने वाचा फोडली, इतकेच नव्हे तर हा अन्याय दूर करून घेण्यासाठी जगातील सर्व मजुरांना एकत्र येण्याची हाक दिली. ' जगातील मजुरानो, संघटित व्हा. बेड्या ( बंधने ) शिवाय तुमच्याजवळून हिरावून घेण्यासारखे काहीही नाही परंतु जिंकण्यास मात्र तुम्हास सर्व जग मोकळे आहे. ' हे मार्क्सचे उद्गार आजही मजुरांना रोमांचित करण्याइतके प्रभावी आहेत. मार्क्सने घातलेल्या कामगार







चळवळीच्या या पायाचेच पुढे जगड्व्याळ वृक्षात रूपांतर झाले. भांडवलशाहीवर समाजाची व सरकारची एका मागून एक नियंत्रणे येऊ लागली व उपर्युक्त बाबतीत कामगारांची स्थिती झपाट्याने सुधारू लागली. या सुधारणेचा अंतिम पल्ला अजून गाठला गेला नाही तरी त्या दिशेने वाटचाल मात्र निश्चितपणे चालू आहे. मार्क्सला अभिप्रेत असलेला पल्ला बहुधा केव्हाच गाठला जाणार नाही. हे सत्य असले तरी सुधारण्याच्या प्रगतीबद्दल संशय घेणे कोणासही शक्य नाही. असाध्य भाग हळूहळू बाजूला पडत आहे. उदाहरणार्थ, शासनसंस्था विरून जाईल, अथवा सर्वांना सारखाच पगार कधी काळी मिळेल असे गंभीरपणे मानणारे अपवादरूपच असतील. परंतु पगारातील विषमता कमी केली पाहिजे, प्रत्येकाला काम मिळण्याचा हक्क आहे. वगैरे सिद्धांत सर्वमान्य झाले असून परिस्थितीच्या अनुकूलतेप्रमाणे हळूहळू कार्यवाहीत येत आहेत हे विसरून जाण्यात काय अर्थ आहे? तात्पर्य असे की मार्क्सवादाने भांडवशालहीच्या स्वरूपात मानवतेच्या दृष्टीकोणातून क्रांति घडवून आणली आहे. हे मोकळेपणाने मान्य करणेच प्रामाणिकपणाचे व वस्तुस्थितीस धरून होईल.

वरील विवेचन मान्य करणारांपैकीही अनेकजण कदाचित अशी पृच्छा करण्यास प्रवृत्त होतील की उघड उघड असाध्य असणारे ध्येय दलित जनतेसमोर ठेवण्यात मार्क्सने जनतेची दिशाभूल करण्याव्यतिरिक्त अन्य कोणता पुरुषार्थ साधला ? याचे उत्तर पुढील प्रमाणे देता येईल. जनतेची दिशाभूल करण्याचा विचार मार्क्सच्या मनात असू शकेल हे सूज्ञ बुद्धीस पटणार नाही. समानता, शोषण व शासनविरहित समाजाची निर्मिती ही शक्य कोटीतील बाब आहे असे त्याला खरोखरीच वाटत असणे मुळीच असंभवनीय नाही. परंतु याहीपेक्षा महत्त्वाचे कारण हे असावे की समाज ढवळून काढण्यासाठी मिळमिळीत ध्येयवाक्यापेक्षा असाध्य का होईना परंतु आकर्षक, तीव्र व सनसनाटी ध्येयवाक्ये अधिक परिणामकारक होतात हे लक्षात घेऊन मार्क्सने अशा ध्येयाचा पुरस्कार केला असणे शक्य आहे. अशा स्थितीत ध्येयवाक्यांच्या वाच्यार्थाकडे लक्ष द्यावयाचे नसून लक्ष्यार्थावर शक्ति केंद्रित करावयाची असते हेच विवेकीपणाचे लक्षण होय. मार्क्सने वर्तविलेली अनेक भविष्ये खोटी ठरली आहेत. उदाहरणार्थ दिवसेंदिवस भांडवलवाले अधिकाधिक श्रीमंत व मजूर अधिकाधिक गरीब होत जातील, अथवा जगातील भांडवलवाले मजुरांविरुद्ध एकत्र येतील वगैरे. परंतु यायोगे मार्क्सवादाच्या मूलभूत महत्त्वाला धक्का पोचत नाही.

## इतर चुकीच्या कल्पना

पिळणवुकीसंबंधीच्या विवेचनातही डॉ. पटवर्धनांचा असाच गोंधळ उडालेला दिसतो. पिळवणुकीद्वाराच समाजात संपत्ती उत्पन्न होते हे म्हणणे वाच्यार्थाने खरेच आहे. परंतु महत्वाचा मुद्दा हा आहे की पिळवणूक कोणी, कोणत्या हेतूने व किती प्रमाणात केल्यास ती अनिष्ट मानायची हा विवेक न करता ‘ सब घोडे बारा टक्के ’ अशा विवेचनातून काहीच निष्पन्न होणार नाही. सरकार अनेकविध कर बसविते हाही पिळवणुकीचा प्रकार होय व त्याचा अवलंब करणे कट्टर व पूर्णतः समाजवादी सरकारलाही चुकत नाही. परंतु या पिळवणुकीचा हेतू सामाजिक न्याय प्रस्थापित करून समाज समृद्ध करणे हा असतो म्हणून त्यात आक्षेपार्ह तर काही नाहीच उलट ते स्वागतार्हच होय. कारण पिळवणुकीच्या प्रमाणात समाजाची समृद्धी वृद्धिंगत होण्याची शक्यता त्यात असते. अशा प्रकाराला पिळवणूक म्हणणे म्हणजे त्या शब्दाच्या अर्थाची विटंबना करणेच होय. ही पिळवणूक नसून समाजाच्या समृद्धीसाठी व्यक्तीने हातभार लावणे आहे. मार्क्सच्या काळी किंवा हल्लीही भांडवलवाले मजुरांची जी पिळवणूक करतात ती समाजाच्या हितासाठी नसून स्वतःचा नफा वाढविण्यासाठी असते. हीच खऱ्या अर्थाने पिळवणूक होय व मार्क्सने उठविलेले रान तिच्या विरुद्ध होते. पूर्वी या पिळवणुकीला काही मर्यादाच नसे. निदान जिवंत रहाण्यास जरूर एवढी मजुरी न दिल्यास सोन्याची अंडी देणाऱ्या कोंबडीसच ठार मारल्यासारखे होऊन कारखानेच बंद पडतील या भीतीने त्यासाठी अत्यावश्यक इतकी कमीतकमी मजुरी देऊन जास्तीतजास्त नफा खाण्याकडे भांडवलदारांचा कल असे व ते त्याचा पुरेपूर फायदा उठवीत असत. मार्क्सप्रणीत चळवळीमुळे आता नफ्यावर बंधने आली. किमान मजुरीबाबत नियम होऊ लागले इतकेच

नव्हे तर भांडवलदारांच्या नफ्यात मजुरांचीही भागीदारी आहे हे तत्व वाढत्याप्रमाणात मान्य होऊ लागले आहे. कारखान्यांच्या व्यवस्थापनात मजुरांना भागीदारी देण्याचे तत्त्वही हळू हळू उदय पावत आहे. हे सर्व लक्षात घेता मार्क्सवादाने मानवता, हक्कांची जाणीव व सामाजिक न्याय या दिशेने मानव-जातीची प्रगती घडवून आणण्याच्या कार्यात फारच मोठा वाटा उचलला आहे व पुढेही तो उचलीत राहील याबद्दल शंका रहात नाही. म्हणूनच भारताने समाज-वादाचा पुरस्कार करण्यात गैर काही आहे असे समजण्यास कोणतेही संयुक्तिक कारण दिसत नाही. जो भाग मूलतः अशक्य, अव्यवहार्य अथवा आपल्या पारंपरिक संस्कृति-मूल्यांशी विरोधी आहे त्यांचाही स्वीकार केलाच पाहिजे अशी सक्ती कोणीही आपणावर करू शकत नाही. आपण समाजवाद स्वीकारला तोही स्वेच्छेने. दुसऱ्यांच्या भीड अथवा वजनाने नव्हे. परंतु डॉ. साहेबांच्या लेखाचा कल ' खाईन तर तुपाशी नाहीतर उपाशी ' असा आहेसे वाटते ते योग्य नव्हे.

**समाजवाद अपरिहार्य गरज**

मानवता, सामाजिक न्याय व हक्काची जाणीव इतक्यापुरता तर समाजवाद स्वीकारण्यास काहीच हरकत नाही; नव्हे ती काळाची अपरिहार्य अशी गरज आहे. भारताच्या बाबतीत खेदाची गोष्ट अशी आहे की समाजवादाचा पुरस्कार करणाऱ्या पक्षात, विशेषतः राज्यकर्त्यापक्षात सर्वच गोष्टीत विचारांचा गोंधळ व उथळपणा फार मोठ्या प्रमाणात असल्याने समाजवादाचा निश्चित कोणता अर्थ आपणास अभिप्रेत आहे हे स्पष्ट करण्याची तसदी ते घेत नाहीत. मग संदिग्धतेच्या आश्रयाने आपल्या पक्षाचे निवडणुकी-तील स्वार्थ साधणे या हेतूने हे घडत असो अथवा देशाचे हित कशात आहे याबद्दल मूलभूत स्वरूपाचा विचार करण्याची त्यांची कुवतच मर्यादित असल्याने घडत असो. कारण कोणतेही असले तरी देशाच्या दृष्टीने ते दुर्दैवच आहे. डॉ. पटवर्धनांच्या लेखातील अनेक मुद्यांशी माझे मतभेद असले तरी अशा लेखा-मुळे विचारमंथन होऊन आपण नक्की केलेल्या राजकीय ध्येयांचा नेमका कोणता अर्थ आपल्याला अभिप्रेत आहे या संबंधीच्या विचारांना हळूहळू मूर्त स्वरूप येत जाईल असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही. म्हणूनच स्वतंत्र बुद्धीने लिहिलेल्या अशा लेखांचे स्वागत.

---





अनुक्रमणिका








श्री. श्री. ना. चाफेकर

# मराठीतील एक अपप्रवृत्ती

अलीकडे मराठी व्याकरणात एक गढूळ प्रवाह वाहू लागला आहे. अडाणी माणसाची भाषा प्रमाण मानून ती सर्वमान्य व्हावी यासाठी पद्धतशीर प्रयत्न चाललेले दिसतात. अडाणी माणसाची भाषा ही सर्वमान्य करण्यासाठी तीच कशी शास्त्रशुद्ध आहे हे नाना प्रकारे दाखविण्याचा प्रयत्न चालू आहे. संस्कृत वर्णमाला अशुद्ध आहे, संस्कृतची मराठीशी फारकत करविणे, मराठी भाषेतील संस्कृत अवशेष नष्ट करणे, व्युत्पत्ती डावलणे, ग्रांथिकापेक्षा बोलीला महत्त्व देऊन ती प्रमाण मानणे, इ. नाना मतप्रवाह मराठीत आज मुद्दाम प्रसृत केले जात आहेत.

डॉ. कालेलकर यांनी आपल्या 'ध्वनिविचारा'त यापूर्वीच विद्वत्तेचा आधार घेऊन वरील प्रकारचे काही मत-प्रदर्शन केले आहे. असाच आणखी एक प्रयत्न झालेला नुकताच आमच्या वाचनात आला. प्रख्यात संस्कृत पंडित प्रा. मंगरूळकर यांचे 'मराठी व्याकरणाचा पुनर्विचार' हे व्याख्यानांचे पुस्तक पुणे विद्यापीठाने प्रसिद्ध केले आहे. हा प्रयत्न शास्त्रोक्त म्हणून केलेला असल्याने त्याची दखल घेणे आवश्यक झाले आहे.

मराठीच्या व्याकरणाचा व्याप व मर्यादा, ध्वनी, वर्णमाला, शब्दांचे वर्गीकरण, नामविमर्श, विशेषण-सर्वनाम-विभक्ती आणि विभक्ति-धातू या विषयांवर चर्चा करून ही व्याख्याने पूर्ण केलेली आहेत.

भाषाशास्त्र आणि व्याकरण यांविषयी आजपर्यंत सर्वमान्य झालेले सिद्धान्त अमान्य करून मराठीचे एक नवीन व स्वतंत्र व्याकरण तयार करण्याचा प्रयत्न या ग्रंथात केलेला दिसतो. तथापि हा प्रयत्न कितपत शास्त्रशुद्ध आहे आणि निर्हेतुक आहे हे तपासूनच या ग्रंथाचे मोल ठरवावे लागेल.

## प्रा. मंगरूळकरांनी चर्चिलेल्या मुद्यांचा परामर्श

या ग्रंथाचा पहिला विशेष म्हणजे मराठीची संस्कृतपासून फारकत करून दाखविणे. मराठी भाषा स्वयंभू असून तिचे व्याकरणही सर्वतंत्र स्वतंत्र असावे अशी लेखकाची महत्त्वाकांक्षा आहे. दुसरा विशेष म्हणजे जे व्याकरण रचावयाचे ते लिखित भाषेचेच काय म्हणून? बोलीचेही रचावे. मग व्याकरण रचावयास कोणती भाषा निवडावयाची? ज्याची जिव्हा शिक्षणाने संस्कारित झाली नाही आणि जो सहज स्फुरेल तसे बोलतो त्या अडाणी माणसाची. या ग्रंथात बोलीचेच व्याकरण चर्चिले आहे. तिसरे म्हणजे मराठीची वर्णमाला, विभक्ती, नामविशेषणादी शब्दव्यवस्था इ. रचना, जी बरीचशी संस्कृतच्या आधारावर उभी राहून रूढ झालेली आहे, ती बदलून भाषेत कमीत कमी निर्बंध ठेवणे.

आता लेखकाने चर्चिलेल्या मुद्यांचा क्रमवार परामर्श घेऊ.

पृष्ठ ६ वर लेखक म्हणतो, "बहुतेक व्याकरण-ग्रंथात संस्कृतची वर्णमाला जशीच्या तशी घेतलेली दिसते. कालमानाप्रमाणे भाषा बदलते व त्याचे प्रतिबिंब वर्णमालेत दिसले पाहिजे." वास्तविक वर्णमाला ही मूलभूत उच्चारांचे सुव्यवस्थित वर्गीकरण आहे. भाषेमध्ये बदल झाला म्हणून मनुष्याच्या कंठातून निघणाऱ्या मूलभूत ध्वनीत बदल होत नाही. ते ध्वनी भाषेत वापरले जातात. त्या वापराच्या तपशीलात फरक पडेल. शेक्सपीयरपासून आतापर्यंत इंग्रजी भाषेत पुष्कळ बदल होत गेला आहे. पण त्यामुळे इंग्रजी भाषेची जी रोमन वर्णमाला आहे ती बदललेली नाही. जास्तीत जास्त शुद्ध आणि मूलभूत स्वरूपाची व उच्चारानुसारी वर्णमाला मराठीला स्वीकारावयाची झाल्यास संस्कृतशिवाय दुसरी वर्णमाला असणार नाही.

पृष्ठ ९ वरील टीपेमध्ये लेखक मुद्दाम स्पष्टीकरण देतो की, कोशातील शब्द भाषेमध्ये येऊन वापरू लागतात तेथे व्याकरणाचे क्षेत्र सुरू होते. खरे म्हणजे शब्द भाषेतून कोशात येत असतात, कोशातून कधीही शब्द भाषेत येत नसतो.










## एखाद्या बोलीचे व्याकरण प्रमाण मानणे कितपत इष्ट ?

पृष्ठ ११ वर भाषाभेदाचे स्वरूप सांगताना बोली हा शब्द ते मुद्दाम वापरीत नाहीत. कारण बोली व भाषा यांत 'उपजीव्य-उपजीवक' भाव येत असल्याने व त्यामुळे प्रधान-गौण भाव व्यक्त होत असल्याने भाषाभेद हा सर्व बोली व प्रमाण भाषा यांना समान स्वातंत्र्य देणारा नवीन शब्द त्यांनी काढला आहे. परंतु कोणतीही बोली एकाद्या प्रमाण भाषेशिवाय स्वतंत्रपणे उगम पावलेली नाही तसे लेखकानेही सिद्ध करून दिलेले नाही. लेखकाच्या म्हणण्याप्रमाणे प्रत्येक बोलीला स्वतंत्र व्याकरण आहे हे मान्य केले तरी त्यावरून तिचा उगम स्वतंत्र आहे असे ठरत नाही. बोलीला आधारभूत भाषा एक प्रमाणभाषाच असते. सीमाप्रदेशातील बोलीत पलीकडील भाषेच्या मिश्रणामुळे वेगळेपणा येतो. व्यवसायभेदामुळे त्या त्या लोकांच्या बोलण्यात व्यवसायातील सोयीप्रमाणे नवीन शब्दप्रयोग तयार होतात मूळ भाषेतील अडाणी लोक जिव्हेला शिक्षणाचा संस्कार न झाल्यामुळे, नैसर्गिक अपभ्रंश निर्माण करतात. भौगोलिक विस्तारामुळे, निसर्गाच्या भिन्नत्वामुळे निराळे अनुभव व त्यातून निराळे शब्दप्रयोग प्रचारात येतात. हे सर्व बदल मूळ आधारभूत भाषेतच होत असतात. व हे बदल कालांतराने रूढ झाले म्हणजे त्यातून बोली निर्माण होते. अर्थात् मूळ भाषा आणि बोली यात प्राधान्य व गौणत्व हे येणारच. उपजीव्य-उपजीवक भाव असणारच.

पृष्ठ १७ वर "शुद्धाशुद्ध विवेक" सांगताना लेखक म्हणतो, "लिखित अथवा लेखनार्ह भाषेचेच व्याकरण रचणे किंवा जीतली वाङमयरचना मान्यता पावलेली आहे, अशा भाषेचे व्याकरण काय ते उपयुक्त हा एक अपसमज आहे........" ग्रांथिक भाषेस डावलून अशिक्षितांच्या बोलीस प्रामाण्य देण्याचा लेखकाचा हा प्रयत्न आहे. लेखकाच्या म्हणण्याप्रमाणे इतरही बोलीचा अभ्यास करणे जरूर आहे. पण तेवढ्यावरून ग्रांथिक भाषेचे महत्त्व व प्रामाण्य कमी करण्याचे कारण नाही. व्याकरण हे कोणत्या भाषेचे रचता येते? आणि त्या व्याकरणाचा हेतू काय ? ज्या भाषेतील उच्चार आणि प्रयोग जिव्हेच्या संस्कारांनी स्थिरावलेले आहेत आणि त्यामुळे त्यांच्या वापरात ( Standardization ). आले आहे. अश ाच भाषेचे व्याकरण रचता येणे शक्य आहे. आणि हे रचण्यामागे शक्य आहे. जिव्हेच्या संस्काराने Standardize झालेले उच्चार व प्रयोग जास्तीत जास्त लोकांस आणि जास्तीत जास्त कालात समजावेत व वापरता यावेत हा मुख्य उद्देश आहे. या कामी ग्रांथिक भाषेसारखे दुसरे उत्तम साधन नाही. बोलीचे व्याकरण प्रमाण मानावयाचे ठरविले तर अनेक प्रश्न निर्माण होतात. कोणत्या बोलीचे ? कोणत्या माणसांचे ? शिवाय ती जी बोली ठरेल ती व्याकरण रचून पुरे होईपर्यंत तिच्यातील उच्चार आणि प्रयोग कायम राहणार आहेत काय ? प्रत्येक माणसागणिक व प्रसंगागणिक भाषा बदलते. हे स्वतः लेखकच म्हणतो. मग अनेकजण अनेकवेळा अनेक उच्चार व अनेक प्रयोग करणार. त्यातील कोणाचे व्याकरण रचावयाचे व कोणाकरिता ? बोली ही व्याकरणाच्या नियमाने कधी चालत नसते. उलट ग्रांथिक भाषा मात्र नियमानेच चालते. बोली अस्थिर, अपूर्ण असते. काही वेळा तर संदर्भाशिवाय तिचा अर्थही कळणे कठीण.

लेखक स्वतःच प्रत्येक बोलीला स्वतंत्र व्याकरण असते असे म्हणतो. मग एका व्याकरणात दुसऱ्या व्याकरणाची भोंगळ मिसळ कशासाठी ? लिखित भाषेत बोलीची मिसळ रुचकर लागणार नाही.

पृष्ठ १८ वर शुद्धाशुद्धाचा विवेक म्हणून अविवेकच सांगितला आहे. केवळ संस्कृतला जवळ हा शुद्धतेचा निकष कोणी मानीत नाही. पण संस्कृत शब्द संस्कृतप्रमाणे लिहावेत एवढ्यावरून हाच सबंध शुद्धलेखनाचा निकष लेखकाने स्वतःच्याच युक्तिवादाच्या सोयीकरिता ठरविला आहे. आणि मग त्याचे खंडन करण्यास सुरुवात केली आहे. संस्कृतची सरूपता हा मराठीतील प्रत्येक शब्दाच्या शुद्धतेचा निकष नाही हे ते सोयीस्करपणे विसरले आहेत. भाषेच्या घटनेप्रमाणे भाषेचे लेखन करावे हाच शुद्ध लेखनाचा मूळ पाया आहे.

आपल्या समर्थनार्थ काही अशुद्धाचे नमुने दिले आहेत. "गोपी खेळतो", "कृष्णाची चेंडू यमुनेची












डोहाचा बुडालो." "यंदा पुण्याते फार मोठी पूर आल्या." प्रा. मंगरूळकरांना एवढेच अशुद्ध दिसते. 'पानी, करूनशान' अशासारखे इतर बोलीतील शब्दप्रयोग त्यांना स्वीकारार्ह वाटतात. कारण ते कोणत्याना कोणत्या एका बोलीत शुद्ध आहेत ! केवळ विभिन्न विभक्ती, वचन व लिंग यांच्या दोषांची उदाहरणे लेखकाने दिली. जणु काही शुद्धलेखन हे फक्त लिंग, वचन, विभक्ती एवढया पुरतेच आहे ! शुद्धलेखनात वाक्याच्या घटनेप्रमाणे शब्दाचीही घटना पाहणे आवश्यक आहे. लिंगवचन विभक्ती कोणती वापरावी हा शुद्धलेखनात कधी वाद नव्हता व होणारही नाही. मुख्य वाद आहे तो शब्द कसा लिहावा यासंबंधी. पण नेमके हेच लेखकाने टाळले आहे.

'पानी', करूनशान' या सारखे भिन्न बोलीतील शब्द ते शुद्धलेखनाच्या दृष्टीने ग्राह्य मानतात. पण लेखकाच्याच मताप्रमाणे प्रत्येक बोलीचे व्याकरण स्वतंत्र असते असे मानले तर एका व्याकरणातील प्रयोग दुसऱ्या व्याकरणात शुद्ध कसा मानता येईल? जोपर्यंत भाषान्तर्गत सर्व बोलींचे एक संयुक्त व्याकरण निर्माण झाले नाही तोपर्यंत भिन्न बोलीतील प्रयोग अशुद्धच समजला पाहिजे. शिवाय लेखक म्हणतो त्याप्रमाणे जर भाषा ही शास्त्रांच्या चौकटी-पेक्षा जनतेच्या मुखातूनच घटवली जाते असे आहे तर घटवलेल्या भाषेत परकीय मिश्रण रुचकर लागेल काय ?

पृष्ठ ३३, ३४ वर लिखित विरुद्ध बोली अशी एक अत्यंत तर्कदुष्ट मीमांसा केली आहे. जणू काही लिखित भाषा ही कोणा परक्याची भाषा आहे अशा आवेशाने बोलीच्या पुरस्काराचा प्रयत्न केलेला आहे. बोलींचा अभ्यास कोणत्याच भाषापंडिताने गर्हणीय मानलेला नाही. तथापि भाषाशास्त्र म्हणून अभ्यास केला तरी त्याचे व्याकरण रचण्याचा आणि ते सर्व समाजाने व भाषाशास्त्राने एक विशिष्ट भाषे-करिता प्रमाण मानण्याचा आग्रह धरणे हे कोणत्याही भाषाशास्त्रात बसत नाही. शिवाय या सर्व विवेचनात जिलाच शास्त्रबद्ध करणे शक्य आहे आणि जी अधिकांना अधिक काल उपयुक्त अशा लेखी भाषेला का वगळावयाचे याचे सबळ कारण कोठेच दिले नाही. लेखकाचा आग्रह नुसता बोलींचा अभ्यास करावा असा नसून लेखीच्या शब्दांपेक्षा बोलींचे बोल प्रमाण मानावे आणि तेसुद्धा ज्यांची ती बोली नाही त्यांनी प्रमाण मानावे असा आहे.

लेखक म्हणतो, "बोलण्यातील भाषा हा मूळ झरा असल्याकारणाने. . . . . . .त्या बोलण्यातल्या भाषेचा आणि तिच्या व्याकरणाचा विचार करणे प्रधान आहे". बोलीचे व्याकरण सर्वमान्य करण्यास हे कारण सबळ तर नाहीच पण चूक आहे. गंगा कितीही पवित्र आणि उपयुक्त नदी असली व म्हणून ती पूज्य मानिली म्हणून तपेलीभर पाणी रस्त्यात सांडून झालेला प्रवाह हा केवळ पाणी आहे म्हणून गंगेप्रमाणे पूज्य मानता येत नाही. गंगा ज्या विशिष्ट पात्रातून वाहते ते पात्र, तिचे सुदीर्घ अव्याहत आयुष्यमान आणि अखंड चालणारे प्रत्यक्ष तेच पाणी, यामुळे गंगेला पावित्र्य निर्माण झाले आहे. बोली हा जरी मूळ झरा मानला तरी तो झरा सातत्य आणि शुद्धत्व यातून पक्का झाला म्हणजेच त्याला व्याकरणक्षम भाषेचे स्वरूप प्राप्त होते.

याच ओघात लिखित भाषेला दुर्लक्षणीय मानण्या-साठी बोलीप्रमाणे लिखित भाषेतही बदल होतात असे म्हटले आहे. यासाठी दिलेली उदाहरणे हूल देणारी आहेत. भाषेत कितीही फरक पडला तरी फार तर शब्दयोजना बदलेल. भावनाविष्काराची पद्धत बदलेल; पण व्याकरण तेच राहते.

बोलीला प्रमाण मानून तिचे व्याकरण पुरस्कृत करण्याचा लेखकाचा हेतू कसा शुद्ध नाही याचे एक उत्तम उदाहरण म्हणजे पृष्ठ ३९-४० वर प्रमाण भाषेचे लक्षण सांगताना ती मूलगामी, सर्व भाषा-भेदास त्या परस्परांपेक्षा सारखी जवळ, जेथे ती वापरली जाते ती स्थाने सुसंस्कृत, तिचे वाङमय मोठे म्हणून तिचे क्षेत्रही कोणत्याही बोलीपेक्षा मोठे असावे असे लेखकाचे म्हणणे आहे. कोणतीही बोली-सुसंस्कृतांची-सुद्धां-या लक्षणात बसत नाही.

## स्वर व व्यंजने यांची मीमांसा

पृष्ठ ५५ वर स्वर व व्यंजन यांची मीमांसा केली असून स्वर व व्यंजन यात लक्ष्मणरेषा नाही असे








लेखकाचे म्हणणे आहे. ते सिद्ध करण्यासाठी त्याने य, व, र, ल या व्यंजनांचे उदाहरण देऊन व कमीत कमी प्रतिबंध म्हणजे स्वर अशी नवी व्याख्या देऊन चालू संस्कृत वर्णमाला ही शुद्ध तात्त्विक नाही असा आक्षेप घेतला आहे. संस्कृत वर्णमालेला दोषी ठरविण्यासाठी स्वर आणि व्यंजन यांची व्याख्याच लेखकाने बदलून टाकली. कंठ, तालू, मूर्ध्य, दंत, ओष्ठ यांचे ठिकाणी होणारे स्पर्श व्यंजन निर्माण करतात ही व्याख्या त्यास बाद करावी लागली. परंतु त्याचे कारणच काय पण उल्लेखही दिला नाही.

यातूनच ऋ, लृ ही व्यंजने असल्याचे लेखकाने म्हटले आहे. केवळ लांबविता येणे या गौण लक्षणाला व्याख्यारूप करून लेखकाने तेवढ्यावरून ऋ, लृ, ही व्यंजने म्हटली आहेत. तथापि त्याही बाबतीत लेखक डळमळीत दिसतो. ( पृष्ठ ६२ वरील ३ री टीप पाहा.)

पृष्ठ ६२ वरील 'ऐ' 'औ' यांची मीमांसा अशीच गैरसमजावर आधारलेली आहे. लेखकाचे म्हणण्याप्रमाणे 'ऐ' म्हणजे अ+इ व 'औ' म्हणजे अ+उ, असे आहेत. परंतु संस्कृतात अ+इ याचा संधी 'ए' व अ+उ यांचा 'ओ' होतो. वास्तविक लेखकाला या संबंधात आक्षेप घेण्याचे कारण नव्हते. बोलताना वर्णांचा अलगपणा जेथे सहजपणे नष्ट होतो तेथे संधीला सुरुवात होते. संस्कृतातील संधी उच्चारांचा उत्तम समन्वय आहे. लेखकाच्या म्हणण्याप्रमाणे 'ऐ' चा अुच्चार अ+इ असा मानणे हे किती सदोष आहे हे खालील उदाहरणावरून दिसून येईल. सहवीर्यं करवावहै याचा उच्चार–. . . . . वही करणे चूक होईल. 'ऐ', 'औ' हे जर स्वतंत्र स्वर मानावयाचे नाहीत तर अॅ (अ+ए), ऑ (अ+ओ) हे स्वतंत्र का मानावेत? 'श्रद्धावाँल्लभते ज्ञानम्' हे वचन लेखक विसरला म्हणूनच बॅट, बॉल इ. नवीन स्वर मराठीत आले त्यांची व्यवस्था करावयास हवी असे म्हणतो.

लेखकाने पृष्ठ ६६ वर ख, छ, ठ, ध, थ, फ, इत्यादींची फोड करून प्रत्येक वर्गातील पहिल्या व्यंजनात 'ह' मिळवला आहे असे म्हटले आहे. सघोष 'ह' जर लेखक कण्ठ्य मानतो तर ढ, झ, ध, भ, इ. वर्णातील 'ह' कण्ठ्यच आहे काय ? व्यंजनातील 'ह' कार स्वतंत्र मानून सोपी वर्णमाला अधिक गुंतागुंतीची व अशुद्ध केली आहे. हे सर्व केवळ संस्कृत पद्धतीचे अुच्चाटन करण्यासाठीच आहे काय अशी शंका येते.

वरीलप्रमाणे 'ह' युक्त व्यंजने लेखक संयुक्त व्यंजने मानीत नाही. त्याचे कारण देताना 'पूर्व-वर्णावर अनाघात हे देतो पण आघात होणे ही संयुक्त व्यंजनाची व्याख्या नाही हे निराळे सांगावयास हवे काय ? दोन व्यंजने एकत्र आली असता संयुक्त व्यंजन तयार होते. पण लेखक चातुर्याने ही व्याख्या गुलदस्तात ठेवतो. आणि सबंध 'ह' च्या विवेचनात 'ह' ला नुसते वर्ण म्हटले असून 'ह' हे व्यंजन की स्वर याचा उल्लेख कटाक्षाने टाळला आहे. मात्र पृष्ठ ६७ वर 'अधोरेखा त्या त्या वर्णाचे अविभाज्यत्व दर्शविते' असे म्हटले आहे. म्हणजे काय ? संयुक्तासंयुक्त यांचा विवेक स्पष्ट न करता अविभाज्यत्व या शब्दाला काय अर्थ उरतो ? याचेच पुढे लेखकाने एक अत्यंत गनिमी वाक्य टाकले आहे. तो म्हणतो, " क्‌ह=ख हा दृश्य लेखाकार आपल्याला चकवून संयुक्त व्यंजनांची अकारण भ्रांती निर्माण करील." लेखकालाच ही भीती वाटत आहे. कारण क्‌ह हा संयुक्त वर्ण मानला गेला तर नवीन वर्णमाला निर्माण करण्याचा मनोराच ढासळून जाईल. अनाघाती संयुक्त वर्णांची अुदाहरणे देतानाही लेखकाच्या हे तूतील अशुद्धता दिसून येते. वही, सही यांची अनेक वचने देताना वय्हा, सय्हा अशी लिहिली आहेत. परंतु आ प्रत्ययही नंतरच येतो. हे ते सोयीस्करपणे विसरतात. वयूहा आणि वह्या यांचे अुच्चारही अगदी भिन्न आहेत.

त्याचप्रमाणे पृष्ठ ६८ वर पऱ्हे, वल्हे, उन्हाळा, यातील न्‌ह, ल्‌ह ही असंयुक्त व्यंजने लेखकाने ठरविली आहेत. 'ह' ला स्वर न ठरविता ही असंयुक्त व्यंजने कशी म्हणता येतील ?

पृष्ठ ७८ वर संस्कृतवर्णमालेचा प्रामाणिकपणे विचार न करता एकदम विधान करून टाकले आहे की, "जेथे जेथे स्वतंत्र लेखाकार असतो तेथे तेथे स्वतंत्र एक ध्वनी असतो असे नाही." वास्तविक साधारणपणे इतर कोणत्याही लिपीत सापडत नाही असा हा संस्कृतचा विशेष आहे. ध्वनीप्रमाणे त्याला स्वतंत्र लेखाकार नाही असा वर्ण संस्कृत वर्णमालेत सापडणार नाही.





अनुक्रमणिका

'ज्ञ' वर्णाची फोड संस्कृतमध्ये ज् + ञ अशी करतात. पण तीले खकाला मान्य नाही. कारण मराठीचा अडाणी मनुष्य ती द् + न् अशी करतो. तीच शुद्ध मानून त्याला पुरावा म्हणून लेखकाने अनेक संस्कृतो-द्‌भव भाषांतील 'ज्ञ' चे पुरावे दिले आहेत. त्या पुराव्यांवरूनच असे दिसते की त्या उधृत सर्व भाषांतून 'ज' चा 'ग' होऊन कधी ञ तर कधी न् राहिला आहे. तेव्हा जञ ही फोड केवळ परंपरागत म्हणून कमी लेखण्यात काय अर्थ आहे ? मुळात जञ होता म्हणून तर त्याचा अपभ्रंश गञ किंवा गन झाला.

## व्युत्पत्तिशास्त्राची चेष्टा

भाषाशास्त्रात व्युत्पत्तीला स्थान महत्त्वाचे आहे. व्युत्पत्तीला जर भाषाशास्त्रातून वाद करावयाचे तर ते का व त्याशिवाय भाषाशास्त्र पूर्ण राहू शकेल हे प्रथम सिद्ध करावे लागेल. परंतु ते न करता व्युत्पत्तीला सोयीस्करपणे वगळणे हा भाषाशास्त्रीय मोठा प्रमाद होईल. डॉ. भांडारकरांनी षष्ठीच्या 'चा' प्रत्ययाची व्युत्पत्ती संस्कृत षष्ठीच्या "स्य" मध्ये दाखवली आहे. या निरुत्तर करणाऱ्या तोडग्याचा संताप येऊन त्याचे शास्त्रीय खंडन न करता लेखक पृ. १२० वर चिडून म्हणतो की, "......व्युत्पत्तीचा प्रश्न नुसता गौणच नव्हे, तर भ्रांतिमूलक, भ्रांतिजनक, निरुपयोगी, गैरलागू आणि प्रामादिक आहे." भाषाशास्त्रात व्युत्पत्तीचा अुपयोग करण्यावर लेखक तुटून पडतो. त्याच विवेचनात लेखक पुढे म्हणतो, "पूर्व जन्मी एकादा माणूस वानरयोनीत होता, म्हणून आजही तो वानरच म्हणावयास हवा, असे म्हणण्यासारखे हे आहे." व्युत्पत्तीशास्त्राची ही मर्कटचेष्टा संस्कृत द्वेषाचेच लक्षण दाखविते.

## हूल देणारी भाषा

तद्धित प्रत्ययाने वचनाचा बोध होत नाही हा षष्ठीच्या 'चा' प्रत्ययावरील युक्तिवाद मोरो केशव दामले यांनी केला आहे. तो लेखकास खोडता आला नाही. दामल्यांचा आक्षेप मान्य करूनही लेखक 'चा' ला विभक्ती मानावयास तयार नाही. शेवटी निरुपायास्तव लेखकाने दिलेला निर्णय त्याचे वकिली कौशल्य दाखवितो. पृ. १२२ वर तो म्हणतो. "एकाद्या गटाने व्याकरणाच्या व्यवस्थेत अमुकच ठिकाणी बसले पाहिजे असा आग्रह धरण्याचे खरोखर कारण नाही."

ग्रंथात अनेक ठिकाणी प्रचलित भाषाशास्त्राला डावलून केलेली विधाने आली आहेत. त्यापैकी काहींचाच फक्त येथे परामर्श थोडक्यात घेतलेला आहे. विस्तारभयास्तव आणि औचित्यहानी होऊ नये म्हणून त्यांचा उल्लेख करण्याचे टाळत आहे. याशिवाय सर्वत्र भाषा तर्कदुष्ट, भाषाशास्त्राच्या तत्त्वांना डावलून हूल देणारी, हातचलाखीने स्वतःचा मुद्दा पटवून दिल्याचा आव आणणारी अशी वकिली भाषा सर्व ठिकाणी दिसते. याची उदाहरणेच द्यावयाची झाल्यास खालीलप्रमाणे थोडीशी देता येतील. पृष्ठ ११ वरील लिखित आणि बोलीचे विवेचन; पृष्ठ ३९-४० वरील प्रमाण भाषेची मीमांसा, पृष्ठ ४४ वरील ध्वनी आणि वर्ण, पृष्ठ ५७-५८ वरील स्वरांचे ऱ्हस्व-दीर्घत्व, पृष्ठे ६६-६८ मधील 'ह' वर्णाची मीमांसा, पृष्ठ ७८ वरील लेखाकार व ध्वनी यासंबंधीचे उपरिनिर्दिष्ट विधान, पृष्ठ १०१ वरील लोके, फुले, यांची 'लोकऽ', 'फुलऽ' आणि पृष्ठ १४-वरील 'करूनशान' अशांसारखी बोलीतील अशुद्ध रूपे व्याकरणाच्या विचारार्थ गृहीतकृत्य म्हणून स्वीकारणे, पृष्ठ १२१ वरील व्युत्पत्ती-शास्त्राची निर्भर्त्सना, पृष्ठ १२०–१२४ वरील विभक्ति-विवेचनातील हलका व फसवा युक्तिवाद इ.

लेखकाचा भर मराठीच्या अडाणी बोलीवर विशेष आहे. त्यांचे व्याकरण झाले नाही म्हणून त्यास रुखरुख लागलेली आहे, व्याकरणशुद्धता संस्कृतप्रधान शिष्ट मराठीपेक्षा अडाण्यांच्या बोलीत अधिक आहे असे लेखकाचे मत आहे. व मराठी व्याकरणात संस्कृतचा आणि इंग्रजीचा पगडा उगाचच वर्चस्व गाजवून आहे याबद्दल त्यांची तीव्र नापसंती व्यक्त झालेली दिसते. परंतु लेखकाची स्वतःची भाषा मात्र इंग्रजी वाक्प्रचारांचे भाषांतर असलेली आणि उगाचच संस्कृत क्लिष्ट शब्दांनी भरलेली आहे. लेखकाला संस्कृतक्लिष्ट शब्दांचे किती वेड आहे हे खालील यादीवरून दिसून येईल.











पृ.११–स्तर, सर्वदृष्ट, कालिक, दैशिक, मध्य-वर्तिनी, परस्परसंपृक्त आणि समव्याप्त, पौर्वापर्य, दृष्ट (दृश्य).

पृ. १२–व्यापकतर.

पृ. १३–व्याकरणबंध, व्यामिश्र.

पृ. १४–सावधान, विचारवंत, योग विभाग (म्हणजे व्यवस्था असे म्हणावयाचे असावे).

पृ. ३२–उद्भावित.

पृ. ४१ अनुकृष्टत्व, (४६) प्रतिवेष्टितजिव्हाग्र-मूर्धस्पर्शयुक्त, (६१) परस्पर संक्रांत.

पृ. ९०–सूत्रपात, (९४) उद्बुद्ध, (९७) प्रजाति (Sex), (९८) आनुपूर्वी, (१०२) अपरामृष्ट, (११५) परि-वृत्तिसह–

(–या ठिकाणी सह याचा अर्थ समवेत असा नसून सहन करण्यासारखे असा आहे).

पृष्ठ (११९) गतार्थ, (१२३) अव्याकुलपणे.

प्रा. मंगरूळकर हे संस्कृतपंडित आहेत. अर्थात् ही माहिती या ग्रंथावरून मिळत नाही. एकाद्या संस्कृतच्या अनभिज्ञ लेखकाने हा ग्रंथ लिहिला असता तर या ग्रंथाचे मोल विशेष होते. फक्त त्याने संस्कृत व्याक-रणाची माहिती करून घेतली असती म्हणजे यातील बराचसा भाग त्याने आपण होऊन त्याज्य ठरविला असता. तथापि संस्कृत पंडिताने संस्कृतच्या नियमांकडे सोयीस्करपणे दुर्लक्ष करून विपरीत विधानांवर प्राकृत भाषेच्या व्याकरणाची उभारणी करावी याबद्दल सखेदाश्चर्य वाटते. यावरून जर कोणी लेखकाच्या हेतुशुद्धतेबद्दल शंका उत्पन्न केली तर त्या शंकेखोराचे समाधान करणे कठीण आहे.

---





अनुक्रमणिका








श्री. श्री. रा. टिकेकर

त्र्यं. शं. शेजवलकरकृत--

# श्रीशिवछत्रपति चरित्र साधन ग्रंथ परीक्षण ( उत्तरार्ध )

" शिवाजीचा प्रयत्न मुसलमानी राज्ये नाहीशी करून हिंदु राज्ये वाढविण्याचा होता. पेशव्यांचा हेतु अखिलभारतवर्षमान्य अशी मोगल बादशाही कायम ठेवून ती स्वतः चालवून दाखविण्याचा होता. "

त्र्यं. शं. शेजवलकर

( नवभारत. फेब्रु० १९४८ )

श्रीछत्रपतींचे संकल्पित चरित्र प्रसिद्ध न होता त्याखातर गोळा केलेले साहित्य प्रसिद्ध करावे लागले, ही एका परीने इष्टापत्ती ठरते. कारण भावी चरित्र-लेखकांना मार्गदर्शक असा हा ग्रंथ होय. चरित्रात पद्धत समजली नसती, फार तर उपयोगात आणलेल्या साधनांचा परिचय घडला असता. नाकारण्याजोगे देखील साहित्य साधनग्रंथात समाविष्ट आहे. म्हणून ह्या ग्रंथामुळे चरित्रलेखनतयारीचा प्रत्यक्ष धडा शेजवलकरांनी ( त्यांचे हे साहित्य प्रकाशित करणारांनी ) घालून दिला आहे.

स्थलानुक्रमे, व्यक्तिनामानुक्रमे, घटनांच्या नोंदी असल्याने परस्परसंबंध नीट साधावयास हवा. कालपटाचे बंधन पत्करल्यामुळे घटनांचा-क्रम अचूक ठरतो. कोणत्या काळाबद्दल अपुरी माहिती आहे ते स्पष्ट होते आणि तेवढ्याच संशोधनावर भर देता येतो. शिवचरित्रात अशा बाबी कमी नाहीत. शहाजीच्या हालचाली-शिवाजीच्या दौऱ्यातले मुक्काम, संभाजीच्या जीवनाचे तपशील...याबद्दल अजून पुष्कळ माहिती समजणे आवश्यक आहे. आपल्या वडील पुत्राचा मंगल विवाह शिवाजीने कसा साजरा केला, कोणाकोणाला त्या शुभसमारंभासाठी बोलावले, आणि आले कोण, इत्यादि तपशील कळतील तर बरे होईल. कारण संभाजीचरित्रकारांनी* चंपाविवाहाचे विस्तृत वर्णन संस्कृत काव्याच्या आधारे दिले असले, तरी छत्रपति शंभुराजाचा तो विवाह नव्हे असे आता सिद्ध झाले आहे. संभाजी मोगलाकडे गेला (ता. १३।१२।१६७८ ) तेव्हा येसूबाई त्याजबरोबर होती हे रियासतकारांचे म्हणणे अवास्तव ठरते. कारण येसूबाई ते वेळी आसन्नप्रसवा होती. ता. २८।१।१६७९ रोजी ( म्हणजे दीड महिन्यानी ) ती प्रसूत होऊन तिला श्रृंगारपुरी लेक झाल्याची खबर त्यानीच दिली आहे. ( **उग्रप्रकृती संभाजी पृ. १०६** ). याबाबत अधिक संशोधन होणे जरूर आहे. कारण संभाजी परत आला तेव्हा बरोबर पुरुषवेषधारी येसूबाई होती असे रियासतकारांनी म्हटले आहे. (**शककर्ता शिवाजी-** पृ. २०५ )

> ### गांधीजींचा पूर्वावतार
>
> **आमचे** इतिहासकार इतके अनैतिहासिक होतात की ते कालावर नजर ठेवून शाहूला महात्मा गांधींचा पूर्वावतार समजतात. हिंदु-मुसलमानांच्या एकीचा सौम्य, सामोपचारी मार्ग त्याने अवलंबिला म्हणून त्यास शाबासकी देतात.

* टिपणातील एतत्संबंधी निर्देश अवास्तव आहे. ( पृ. ४४९ ) चंपा-संभाजी परिणय स. १६७९चा म्हणजे संभाजी मोगलांकडे असतां घडल्याचा उल्लेख " मासिरी " त आणि औरंगजेबनाम्यात आहे असा त्यावरून समज होतो, तो चूक आहे. " चंपा " हे नाव किंवा विवाह-काल यांचा उल्लेख उपरोक्त दोन्ही ग्रंथात नाही.



अनुक्रमणिका

### कायमची यादवी

**शा**ह्वूच्या मार्गाने हिंदुस्थान दुबळा होऊन त्यात दुफळी झाली. तोच मार्ग गांधीनी अवलंबिल्यामुळे हिंदुस्थानची छकले झाली. यादवी ही आता कायमचीच पाठीस लागणार आहे. या सर्व अनर्थांचे कारण एकच : अनैतिहासिक, आत्मानात्म अविवेकावर उभारलेली राजकीय विचारसरणी.

संभाजीबद्दल आणखी एक दोन गोष्टींचा तपशील कळावयास हवा. त्याची मुंज ता. ४ फेब्रु. १६७५ रोजी झाली असा जेधे शकावलीत उल्लेख आहे. ती राज्याभिषेकानंतर इतक्या उशीरा का झाली याबद्दल काही तर्क आहेत पण खुद्द शिवाजीच्या राज्याभिषेक कालच्या लग्नसमारंभास काही घरगुती अडचणी आल्या. तशीच अडचण संभाजीबाबत आली असावी. कारण नुसत्या वेदोक्त मुंजीखेरीज त्याचा वेदोक्त विवाहही लगेच व्हावयाचा होता. म्हणून सुमारे आठ महिन्यानंतर ही मुंज झाली असावी; मुंजीनंतर विवाहही पार पडला असला पाहिजे.

कालपटाचे बंधन स्वीकारल्यामुळे बखरीतले किंवा इतर निर्देश कसे पारखून निघतात, हे दाखविण्यासाठी एवढे संभाजीपुराण लांबले. शेज०च्या मदतनिसांनी टिपणे पुष्कळ काढली खरी पण छापण्यापूर्वी त्यांची कसून छाननी केली नाही. शेज०च्या पद्धतशीर प्रयत्नांचे हे प्रदर्शन असल्याने ते शक्यतितके निर्दोष राखणे आवश्यक होते. बारकाईने वाचल्यावर ह्या टिपणातील ढोबळ चुका दिसू लागतात आणि याबाबत अधिक दक्षतेची गरज होती हे कळते.

ह्या टांचणा-टिपणात मुख्य दोष खटकतो. तो हे काम जाणतेपणाने न केल्याचा. इंग्रजी कागदपत्रात भारतीय स्थलनामे वेगळ्यापद्धतीने लिहिलेली असतात. ती रूढ नकाशांच्या मदतीने निश्चित करणे अत्यावश्यक होते. इंग्रजी नावाचे तर राहो-पण मराठी स्थान-नामांचे निश्चित ज्ञान अपेक्षित असता संदिग्धपणामुळे गोंधळ मात्र वाढला आहे. स्थानपरत्वे घटनांच्या टिपणांमुळे इतिहास स्पष्ट समजावयास हवा; पण ह्या प्रकारामुळे साधी घटनासुद्धा नीट समजत नाही. उलट गोंधळ माजतो. तो असा–

कर्नाटकस्वारीचे वर्णन करताना म्हटले आहे की "नोव्हें. १६७७ त शिवाजी **कर्नाटकातून परत फिरला** व **म्हैसूरला आला.** (पृ. ४८३) वास्तविक एप्रिल १६७८ पर्यंत शिवाजी कर्नाटकात–कानडी मुलखात–धारवाड, लक्ष्मेश्वर, कोप्पळ, गदग, बंकापूर, संपगांव...या बाजूस असता "कर्नाटकातून परत फिरला" याचा अर्थ काय समजावा ? इंग्रजी कागदपत्रात मद्रास, पॉंडिचरी, तंजावर ही ठिकाणे "कर्नाटकात" असल्याचा उल्लेख वारंवार येतो–त्या अर्थाने हे प्रदेशनाम उपयोजिले असावे, एकाच नांवाची दोन भिन्न ठिकाणे असल्यावर तर, घोटाळा अधिक वाढतो. सुपे, एक पुणे जिल्ह्यात आहे. तर दुसरे कारवारकडे ! नळदुर्ग या नांवाची दोन ठिकाणे (१) ठाणे जिल्ह्यात मुरबाडच्या आग्नेयीस सहा मैलावरचा किल्ला– (२) सोलापूरजवळचे पण उस्मानाबाद जिल्ह्यातले. स्थलनामानुक्रमे टिपणे (पृ. २८५–३५२) काढताना स्थाननिश्चिति नसल्याचे प्रत्यंतर वारंवार मिळते. टिपण काढताच प्रथम ओळख पटण्यासारखी खूण (जिल्हा - जवळचे मोठे ठिकाण,) सांगणे आवश्यक असते. नाहीतर "अन्धेनेव नीयमाना यथान्धाः" अशी अवस्था होते. स्थलवाचक टिपणातले वैगुण्य हेच की त्याची निश्चित कल्पना टिपण काढणारानासुद्धा नाही; ठिकाणाबद्दल अनिश्चितता असल्यास 'प्रश्नचिन्ह' घालणे इष्ट. पण तसे काही केले नाही. स्थळांचे उल्लेख आहेत-ते शिवचरित्राशी कुठे संबंधित आहेत– याचाही निर्देश असणे आवश्यक होते. कनकदुर्ग, कर्नाळा, कुंजाळगड, प्रचीतगड, बेलवाडी, बोम्मसमुद्र, मिऱ्या ह्या टिपणांवरून एकदम स्थलबोध होत नाही. शिवचरित्रात ती ठिकाणे कशी आली हेही समजत नाही. बसरूर–बिदनूर (पृ. ३१९–२२) याबद्दलचा घोटाळा अगदी कमालीचा आहे.

"प्रा. शेजवलकरांच्या मते लुटलेले शहर बसरूर नसून बारकूर असे **प्रथम** होते. ते त्यांचे जुने मत **नंतर** त्यांनी बदलले व **बारकूर** नसून **बसरूर** हे ठाणे शिवाजीने लुटल्याचे त्यांनी ठरविले" (पृ. ३२०)











ह्या टिपणाच्या शेवटी म्हटले आहे, "बसनूर म्हणजे खरोखरी बसरूर लुटल्याची बखरीची हकीकत खरी आहे (पृ. ३२२)."

शेज०नी लिहिले म्हणून छापलेले– वास्तविक त्यांच्या लेखनशैलीविरहित असे "बसरूरची स्वारी" हे प्रकरण (पृ. १११–२२) वेगळ्या सुरावर लिहिलेले दिसते. "बेदनूरचे मुख्य बंदर बसरूर म्हणजे पोर्तुगीज व इंग्लिश इतिहासात आलेले बार्सिलोर" (पृ. ११३) असा खुलासा केल्यावर लगेच "बसरूरच्या दक्षिणेस असलेला बार्सिलोरचा किल्ला" (पृ. ११४) अशी नोंद आढळते. वेगळा खुलासाही कळतो– कीं "बसरूरचे नांव बसनूर असे मोडी लिहिण्यामुळे चुकीचे रूढ झाले. ते एक असो; पण ह्या प्रकरणाची एकंदर आखणी उभारणी 'छापणी' ही तर बिनचुक असावी की नाही? त्याचा आरंभ कच्चा, काल्पनिक आणि अव्यवहारी आहे! आम्हास तर घेवड्याचा वेल लावणाऱ्या "जॅक"ची आठवण झाली. महाराज "कोकणात" उतरले. **लगेच** त्या प्रदेशाचे युद्धशास्त्रीय महत्त्व त्यांच्या मनात बिंबले. कल्याण– भिवंडीकडे गेले– **ताबडतोब** त्यांच्या लक्षात भरले की स्वतःची तारवे असल्याखेरीज या बंदरावर आपला ताबा राहणे अशक्य आहे. **लगेच** त्यांनी हुकूम सोडला की जवळच्या सागाच्या जंगलाचा उपयोग करून व्यापारोपयोगी तारवे बांधावी. ती बांधून **होताच** 'नूतन' बंदरांची राजकीय परिस्थिती त्यांच्या ध्यानात आली. अव्यवहारी लिहिण्याचा नमुना म्हणजे ही "स्वारी" होय.

आता अर्धवट माहितीचे नमुने पहा– खुदावंतपुर (पृ. २५१, २९५), एलवनसर (पृ. २४५, २८५), सायब्रॉन–सैवान (पृ. ३४५) व्हाल्दौर (पृ. २२७, ४८३) या गावांची माहिती मिळत नाही. सद्रेमपटम्, तेग (वे) नपटम्, वयेमरायेम (पृ. २०९, २१०, २४३, ४८७) वगैरे ग्रामनामांचा तर पत्ताच लागत नाही. "भूपाळगड" खानापूरजवळ, सातारा जिल्ह्यात आहे. पण त्याला आधार बेळगाव जिल्ह्याच्या गॅझेटियरचा (पृ. ३२५, २६), घेतला! त्यावरून वाटते की खानापूरमुळे हा घोटाळा झाला असावा. बेळगाव जिल्ह्यातले खानापूर वेगळे आहे. "मिऱ्या" हा

> ### सारभूत तत्त्व
>
> **राज्यनिर्मिती** ही काव्यनिर्मितीप्रमाणे प्रतिभेने होणारी गोष्ट नव्हे हे इतिहासाचे सारभूत तत्त्व इतिहासातील गड्डेच नाकबूल करतात, तेव्हा त्यांचे खंडण करणे अशक्य आहे.
>
> महाराष्ट्रराज्याकारणे फकिरी स्वीकारणारे छत्रपति स्वतःला प्रति-ब्रह्मदेव, दुसऱ्याच्या उपदेशाविना व मदतीविना राज्य संपादणी करू म्हणणारे नव्हते. (पृ. ५४१)

कुलाबा जिल्ह्यातला डोंगर–नामदारखानावर शिवाजीने हल्ला केला (१६६२) ते ठिकाण. पण वर्णन दिले आहे ते रत्नागिरीजवळच्या "मिऱ्या" डोंगराचे, रत्नागिरी गॅझेटियरमधले! (पृ. ३२७).

आमचे शेजवलकर अचूकपणाबद्दल प्रसिद्ध होते. हा ढिलेपणा त्यांचा मुळीच नव्हे त्यांच्या नावाने खपणाऱ्या ग्रंथात असा भोंगळपणा रहावा याबद्दल खेद होतो. निरनिराळ्या साधन ग्रंथातून माहिती गोळा केली–तीत एकवाक्यता सहसा आढळत नाही. पण टिपणे लिहिणारांच्या लक्षात ही विसंगति यावी आणि त्याने ह्या विसंगतीबद्दल तेथे निर्देश करावा, अशी वाचकांची, टीकाकारांची अपेक्षा. काम थोडेसे "यांत्रिक" असले तरी त्यातही नजरेचा बारकावा व्यक्त होतो. स्थल, व्यक्ती आणि काल यांच्या मानाने केलेल्या तीनही सूचीत मेळ असावा की नाही? व्यक्ति-नाम-सूचीत– छत्रपति शिवाजी चरित्रासाठी केलेल्या ह्या साधनसंग्रहात– औरंगजेबाचे स्थान केवढे आहे? आमच्या टिपणकारांनी **त्याला फक्त सहा ओळी बहाल केल्या आहेत!** (पृ. ३५७) औरंगजेबाचे नाव न घेता, (मोरोपंतानी निरोष्ठ रामायण लिहिले तसे,) शिवचरित्र लिहिण्याचा शेज०चा संकल्प होता की काय न कळे!!

सहा ओळींचा हा निर्देश कोणता म्हणाल तर औरंगजेबाने दिलेरखानास पत्र लिहून (साल्हेरीच्या पराभवानंतर) कानउघडणी केली– तिचा!! शिवाजी औरंगजेबसंबंधात ही एकच घटना उल्लेखनीय मानावी लागते!! पण टिपणे काढणारांचा हा प्रमाद आहे–










> **शिवभारत**
>
> " **रा**वणाच्या पराभवाने रामायण तयार झाले तसेच औरंगजेबाच्या पराभवाने " शिवभारत " सिद्ध झाले. फक्त ते पुरे लिहिले नाही एवढीच दुर्दैवाची गोष्ट. "

त्यांनी आपली टिपणे पुनः न तपासता छापण्याची घाई केली म्हणून असे झाले. " अफझलखान क्रूर व कडवा नसावा " (पृ. ३५७) असे ज्यांना दिसले त्यांना औरंगजेबाच्या बाबतीतही असेच काहीतरी दिसले असावे– म्हणून त्या " नवरंगी " बादशहाचा एकही रंग (ही कल्पना भूषण कवीची आहे) आपल्या टिपणात उरू दिला नसावा, दुसरे काय ?

टिपणे काढण्यातील ढिलाईचे मासले मुद्दाम सांगितले पाहिजेत. " चौलची शिवपूर्व कालातील हकीकत " (पृ. २९७) सांगताना खालील विधाने आढळतात–

(१) पोर्तुगिजांच्या मदतीने **निजामुल्मुल्क** चौलचे संरक्षण करतो. (इ. स. १५२८)

(२) चौलवर **निजामचा** हल्ला (इ. स. १५७०)

(३) **निजामचा** चौलास वेढा (इ. स. १५७०–७१).

–यातील कालविपर्यास अथवा नामविपर्यास स्पष्ट आहे.

या ठिकाणच्या नोंदी कालानुक्रमे नाहीत–तशा त्या दाभोळच्या टिपणातही (पृ. ३०९) नाहीत. हा निष्काळजीपणा मुळीच क्षम्य नाही. शेज०च्या ग्रंथात तर तो मुळीच नको होता.

ऐतिहासिक अभ्यासासाठी कालमान एक पत्करणे सोईचे. यद्यपि निरनिराळे ग्रंथकार वेगवेगळी वर्षमाने वापरीत असले (संवत्, हिजरी, शके...) तरी अभ्यासाची सोय म्हणून कंसात इसवी सन लिहावे. " भातवडीची लढाई " सांगताना (पृ. ४३५) " हिजरी " वर्षमानाचे तेवढे आकडे तीन वेळा वापरले आहेत. टिपण ५– (पृ. २२९–२४७) यात तारखा दिल्या आहेत, त्यात मध्येच " न्यू " किंवा " न्यू स्टाईल " असा निर्देश आढळतो तो " नव्या कालमानाचा " द्योतक आहे खरे. पण प्रश्न पडतो तो असा की बाकीच्या सर्व तारखा बदलून घेतल्या आहेत की नाही ? नवे ख्रिस्ती पंचांग सर्व तारखांना का लागू केले नाही ? आणि या नव्या पंचांगाबद्दल काही खुलासा हवा होता की नाही ?

टिपणे काढताना मूळ इंग्रजी लेखनाचा किंवा इतर भाषांतील मजकुराच्या इंग्रजी अनुवादाचे सार सांगताना विनोद साधण्याचे पराक्रमही घडले आहेत. " **स्वतःच्या जन्माच्या वेळी शिवाजी शिवनेरीवर होता** " (पृ. ४५६) हे अगदी साधे वाक्य किती विनोदगर्भ आहे ? त्याच तोडीचे दुसरे वाक्य असे : " ते समई राजाराम याची मातुःश्रीस ऋतु प्राप्त झाला हे खबर आली. " (पृ. ४४७) वदतो व्याघाताची इतकी उदाहरणे सहजासहजी मिळाल्याबद्दल कुणी साहित्य-शास्त्रकार आनंदाने आणि हास्यानेही बेहोष झाला असता ! धर्ती हीच, पण तऱ्हा निराळी असलेले वाक्य : " येथील राजा प्रतिदिवशी स्वतःच्या मुसलमानी धर्माचा कट्टर अनुयायी होत आहे " (पृ. १२७) यांतील अर्थ कसा ओळखावा ? आणखी एक नमुना पहा– " कर्नाटकातील कौटुंबिक गोष्टींकडे लक्ष ठेवण्यासाठी म्हणून शहाजीने तुकाबाईशी लग्न केले. " (पृ. ४४१) विवाहाचा हा उद्देश नव्यानेच समजत आहे ! तेव्हा या शोधाबद्दल टिपणकारांची पाठ थोपटली पाहिजे. मात्र या विवाहाचा काल स. १६३७–३९ असावा हा तर्क फारच अव्यवहारी वाटतो.

पुस्तकांचे आधार संक्षेपरूपाने न देता संपूर्ण देऊनही वाचकांना बुचकळ्यात टाकण्याची ही युगत पहाः–

" **सरदेसाईज हिस्टरी ऑफ मॉडर्न इंडिया** " या नावाचे ग्रंथ, त्यांचे अनेक 'भाग' अनेक खंड, यांचा निर्देश (पृ. ४४३) आढळतो. रियासतीच्या नव्या आवृत्तीस जोडलेल्या इंग्रजी " टायटल " मधील हे नाव पुष्कळांना परिचित नाही. छापील निर्देशानुसार या पुस्तकाचे नाव " शहाजी राजे भोसले " पण तो ग्रंथच अवघ्या ९२ पृष्ठांचा. तेव्हा " पृ. १५७ " असणारा ग्रंथ हा फक्त " **शककर्ता शिवाजी.** " "**दुसरी** आवृत्ति " हा उल्लेखही चुकीचा आहे.

टिपणातील विसंगति, गमती व अपुरेपणा याबद्दल अधिक लांबण न लावता, ती छापण्याबाबत



अनुक्रमणिका








काही व्यवस्था आवश्यक होती. टिपणे काढली-त्याचा आधार तेथल्या तेथे दिला हे योग्य. पण त्या आधारांचे **संक्षेप ठरविणे** आवश्यक होते.

' अशाने छपाईत काटकसर ही आपापतः साधते. माहिती वाचताना, आधार, ग्रंथनिर्देश लांबलचक असला, तोच तो वारंवार छापला, तर वाचनात व्यत्यय येतो, " संक्षेप " ठरविण्याबाबतचे नमुनेदार उदाहरण म्हणजे " छत्रपति संभाजी चरित्रा"चे-कर्ते आमचे जुने मित्र श्री. बेंद्रे यांचे. तसे तीन अक्षरी-संक्षेप अनेक ग्रंथाचे देता आले असते. टिपणकारांचे-संपाद-कांचे-कौशल्य व्यक्त झाले असते. अनेक पाने कमी छापावी लागली असती.

शिवचरित्रेलेखनासाठी शेज०ची निवड योग्य झाली; पण शेज०चे मदतनीस निवडताना त्यांची पारख नीट झाली नाही, असे म्हणणे जिवावर येते. शिवछत्रपतिसंबंधी स्वत शेज०ची भावना काय होती, हे त्यांनी आपल्या प्रस्तावनेत स्पष्ट केले - आणि वेळोवेळी ते व्यक्तही झाले. मदत-निसांचेही मनोगत आपसूक व्यक्त झालेले टिपणा-टाचणात आढळते. " शिवाजीचा काल" (पृ. २७६-८१) हे टिपण तर शेजवलकर निधनोत्तर लिहिलेले आहे. त्यातील "रोख" पहाता टिपण करणारांचा दृष्टीकोन समजतो. शेज० च्या सहवासात राहूनही तो दृष्टीकोन कायम रहावा याचे आश्चर्य वाटते.

" शिवाजीची तुलना जगातील थोर पुरुषांशी करणे मूळातच चूक" समजून चालल्यावर " शिवाजी राज-कीय आघाडीवर जिंकला (?) पण कौटुंबिक आघाडीवर पराभव पावला?" हे अनुमान ओघाने आले. मग शिवाजी आदर्श राज्यकर्ता म्हणता येईल का? ही शंका उद्भवणे स्वाभाविक आहे.

शिवकाल, शिवकालीन परिस्थिती यांचा अभ्यास करणारांनी " शिवाजीचे हत्तीदल कमी का ? " हा प्रश्न विचारू नये. कारण महाराष्ट्रातली भूमि हत्तींच्या हालचालींना सोईची नाही. जेथे माणसे मूठभर हुरडा खाऊन रहातात, तेथे हत्ती पोसण्याची जबाब-दारी पत्करील कोण ? शिवाय " गनिमी आमुचा बाणा " शिवकाली निश्चित होता. त्या युद्धपद्धतीस-हत्ती सोईचे कसे ? म्हणून वाटते की असे प्रश्न विचार-

> **हिंदूंचे रक्षण**
>
> **शि**वाजीचा ऐतिहासिक मार्ग स्वीका-रण्याची बुद्धि हिंदुस्थानला होणार नसेल तर हिंदूंचे रक्षण काळच करणार असेल तर करो ! (पृ. ५६४)

णारांना शिवचरित्राचे, शिवकालाचे " ग्यान " झालेले दिसत नाही तीच गोष्ट तोफखान्याची ! गनिमी-काव्यात तोफखान्याला अवसर असतो कुठे ? शिवाय शिवाजी हा नव्याने राज्य स्थापित होता- त्याच्या-पूर्वी ह्या कार्याची " तयारी " कोणी केलेली नव्हती. ह्या गोष्टींचा विसर पडणाराच असले अव्यवहारी प्रश्न विचारील. तोफखाना म्हणजे काही परसात लावायची भाजी नव्हे. खेचरे-घोडी, गोलंदाज " दारू " बनविण्याचे कारखाने, गोळे तयार करणारी मंडळी शिकून तयार व्हावी लागतात. खुद्द पेशवाईत देखील मराठी तोफखान्याबाबत किती अडचणी होत्या याची कल्पना हा प्रश्न विचारणारास दिसत नाही. तोफा डागणारे गोलंदाज परदेशी, परधर्मी नेमावे लागत. सोरा, गंधक इत्यादि दारूसाहित्य मिळण्याची पंचाईत असे. ओतारी, धातुकाम करणारे कारागीर यांना तोफा बनविता येत नसत. त्यासाठी वेगळे हुन्नर-दार लागत- ह्या अडचणी उत्तर पेशवाईतल्या शिव-जन्मानंतर सवाशे-दीडशे वर्षांनंतरच्या. मग शिवकाली ही अडचण विशेष उत्कट असल्यास नवल नाही. समोरा-समोर लढण्याचे तंत्र पत्करायचे नव्हते. गनिमी-काव्याने दुश्मन जेरीस आणावयाचा, त्याच्या तावडीत गवसायचे नाही, या धोरणास हत्ती काय किंवा तोफखाना काय काय, उपयोगाचा ?

" शिवाजी वैष्णव असल्याचे चिन्ह (पृ. ५०२) कोणते ? तर तुळजाभवानीस बकऱ्याचा बळी तो देत असे ! ! काली मंदिरात बंगाल्यात किंवा नेपाळी मंदिरात असे बळी नेहमी देतात, यावरून बंगाल्यातले देवीभक्त वैष्णव ठरतात काय ? नेपाळचे नेवारी किंवा नेपाळी वैष्णव समजावयाचे की काय ? श्री. ब. म. पुरंदरे यांचे चित्पावनासंबंधी उद्गार, त्यांचे " राष्ट्रीय स्वयंसेवकी विचार " इत्यादि टिपणे कशा-साठी आहेत, हे कळणे दुरापास्त आहे. " शिवाजीच्या








## मौलिक आत्मिकता

हिंदु धर्माचे आचार न चुकता पाळण्यात दिसणारी त्याची धार्मिकता; कथा-पुराणादि श्रवणात दिसणारी त्याची उत्कटता; कोणत्याही पंथाच्या गुरूपुढे मान वाकविण्याची त्याची तत्परता; ब्राह्मण, वेदशाळा यांसाठी त्याचे दातृत्व; प्रसंगी जीव धोक्यात घालूनही तीर्थयात्रा करण्यातला श्रद्धाळूपणा; आणि सर्वांहून जास्त ढळढळीतपणे अंगात भवानी संचरण्याच्या गूढ, रोमहर्षण समाधि-प्रसंगात दिसणारी त्याची मौलिक आत्मिकता... या सर्व गोष्टी शिवाजी कसा होता, हे ठरविण्यास पुरेशा आहेत. (पृ. ५६२)

धैर्यासंबंधी अतिशयोक्त उद्गार टिपणकारांच्या नजरेत का भरले याचा थोडा विचार करावा लागतो." "शिवाजी बहुतेकवेळा पालखीत बसून आरामात प्रवास करी" हीच ज्यांची पक्की समजूत, ज्यांनी तो किती वेळ पालखीत बसून हिंडला याची नोंद कटाक्षाने हुडकून काढली (पृ. ४९९). त्यांना शिवाजीच्या धैर्याचे वर्णन नेहमीच अतिशयोक्त वाटावयाचे. खरे पाहिले तर शिवाजी महाराजांच्या धैर्याचे वर्णनच करता यावयाचे नाही. अफझलखानाशी एकटा भेटीस जाण्यात धैर्याची कमाल झाली. तशीच आगरा भेटीची गोष्ट. तेव्हा अशा प्रसंगी धैर्याची अतिशयोक्ती व्हावी कशी? शिवाजीचे हेरखाते सांगताना कॉंग्रेसच्या राज्यांत झालेल्या हेरखात्याची उपेक्षा—तिजमुळे चिन्यानी—पाकिस्तान्यानी उडविलेला गोंधळ (पृ. २८०) एवढे विषयांतर करण्याचे मुळीच कारण नव्हते.

शिवचरित्र लिहिण्यापूर्वी काही काही निर्णय पूर्ण विचारांती ठरविले पाहिजेत. चरित्रनायकाचा उल्लेख कसा करावा? "शिवाजी" हा एकेरी उल्लेख रास्त समजावा, की राजे शिवाजी म्हणावे? "छत्रपती" होण्यापूर्वी त्याचा निर्देश छत्रपति असा करता येत नाही, तसा शहाजी हयात असेपर्यंत "महाराज" असाही करता येत नाही. पृ. १७५ वर एका वाक्यात शिवाजी, राजे, महाराजे अशी तिन्ही नावे वापरली आहेत. तसाच प्रश्न दक्षिणेतल्या "पाच्छायां" बाबत. विजापूर, गोवळकोंडे दिल्लीकर......याबद्दल काय म्हणावे? विजापुरचा राजा, बादशहा असेही उल्लेख आढळतात. पातशाही, बादशहा... हा निर्देश दिल्लीकर सत्तेसाठी, आणि बाकीच्या मुसलमान सत्ता "सुलतानी". त्यांच्या मुख्यांना "शहा" म्हणण्यास हरकत नसावी. मात्र अमीर, सुलतान, नबाब शहा, बादशहा यांचा उपयोग यथायोग्यपणे, **जाणतेपणाने** करावा. वाटेल त्या सत्तेला पातशाही— आणि सत्ताधाऱ्याला बादशहा म्हणू नये. दिवाण, वजीर, प्रधान, पेशवा... ह्या पदनामांचाही योग्य वापर व्हावा. त्याबद्दल अनिश्चितता वा ढिलाई या चरित्रसाधनात अनेक ठिकाणी आढळते, तशी नसावी, ही अपेक्षा.

साधनांची छाननी करताना कोणत्या कसोट्या वापराव्या, याबद्दल शेज०च्या ग्रंथात काही प्रमाद होतील असे वाटले नव्हते. कारण डेक्कन कॉलेजातील इतिहासाचे प्राध्यापक म्हणून अनेक पदवीधरांना त्यांनी पुढील अभ्यासाबाबत मार्गदर्शन केले होते. अनेकांनी त्या अभ्यासाच्या आधारे श्रेष्ठ पदवी प्राप्त करून घेतली. इंग्रजी किंवा पोर्तुगीज अथवा डच "रेकॉर्ड" बद्दल त्यांची अवास्तव कल्पना दिसते. एकतर त्यांना "रेकॉर्ड" ही संज्ञा प्रथमपासून-वेगळया अर्थाने-असते. ते छापून व्यवस्थित प्रकारे सजवून मिळण्याची सोय असते. ह्या सर्व कारणामुळे ते प्रमाणमानण्याकडे कल— न कळता असेल— कदाचित अनेकाचा होतो. तो शेज°चा व्हावा हे मात्र विशेष आश्चर्य. "रेकॉर्डा"वर अवास्तव विश्वास शेज°च्या साधनग्रंथात आढळतो. तसा काही कागदपत्राबाबतही दिसून येतो. शिवाजी-व्यंकोजी पत्रव्यवहार व तत्संबंधी कागद हे विश्वसनीय नाहीत असे सर जदुनाथ सरकार आणि त्यांच्या ह्या मताची ओळख नसलेले शं. ना. जोशी या उभयतांचे मत. दोघाही पंडितांची कारणे भिन्न आहेत. म्हणून ह्या ऐक्यमतयास महत्त्व. आवळसकर संपादित पत्राची गत तीच होते. कारण तंजावरच्या राजकारणी कागदपत्रांच्या आधारामुळे त्या पत्राचे महत्त्व वाढले. ह्या साधनांचा ग्राह्याग्राह्य विचार न करता ते खरे मानून शेज०नी त्यावर मोठा इमला रचिला आहे. एका पत्रा-



अनुक्रमणिका







वरून ते म्हणतात: "मुसलमानांची इतिहास लेखनपद्धति जशी मराठ्यांनी स्वीकारली तशीच महत्वाच्या राजकीय पत्रांच्या नकलांच्या संग्रहाची कल्पनाही त्यांनी अनुकरणात आणली होती." याबद्दल अधिक लिहिण्यापेक्षा आम्ही एवढेच म्हणू की "ठीक आहे."

तंजावरचे राजकारण (शिवाजी-व्यंकोजी पत्रव्यवहार) हा नव्याने सांगोपांग अभ्यासण्याचा विषय आहे. त्यातील ह्या मुद्दयांची निश्चिती होणे आवश्यक आहे: –

१. व्यंकोजीचा जन्मदिवस;

२. शहाजीच्या बंगळूर जहागिरीचे स्वरूप; त्याचे आदिलशाहीशी संबंध; बंगळूर जहागीर शहाजीच्या पश्चात् कुणाकडे वहिवाटीस गेली ?

३. दक्षिण दिग्विजयात शिवाजीच्या प्रवासाचा मार्ग— मुक्काम, कालमानासह.

४. शहाजीच्या अनौरस संततीसाठी व्यंकोजीने केलेली तरतूद.

५. व्यंकोजीस तंजावरचे राज्यपद कसे मिळाले; केव्हा; त्याचे आदिलशाहीशी संबंध; तो स्वतः अभिषिक्त छत्रपति झाला होता ना ?

६. हणमंते घराण्याची पूर्वपीठिका- भोसल्यांशी त्यांच्या नोकरीची छाननी.

ह्या प्रश्नांबद्दल माहिती जितकी तपशीलवार मिळेल तितकी हवी. ती मिळाल्याखेरीज तंजावरसंबंधी उपलब्ध साधनांवर विसंबणे रास्त होणार नाही.

फॅक्टरी रेकॉर्डसंबंधी अवास्तव विश्वास दाखविल्याचे उदाहरण दक्षिण दिग्विजयाचे आहे. शिवकालींचा शिरस्ता लक्षात घेता छत्रपतींच्या पुढील मोहिमांची खबर कुणा परकीयांना आधी कळत असेल असे वाटत नाही. गुप्त हेरांकरवी बातम्या काढण्याचे ब्रिटिश कौशल्य कबूल करूनही दीड पावणेदोन वर्षे आधी शिवाजीच्या दख्खनच्या मोहिमेचा बेत ब्रिटिशांना ठाऊक होता असे म्हणवत नाही. बाजार-गप्पा या ठिकाणाहून त्या ठिकाणी लिहून व्यापाऱ्यांनी कळवाव्या हे तर त्यांचे नित्याचे कार्य. आजही पुष्कळ व्यापारी कंपन्यांच्या एतद्देशीय कचेऱ्यातून अशा बातम्यांचे पत्र परदेशात नित्यनेमाने जाते. पण त्यापैकी काही 'गप्पा' कालान्तराने खऱ्या ठरल्यावर तदनुरोधाने तर्क चालवून

> **माणसांची पारख**
>
> शिवाजीचा ज्यांवर परिपूर्ण विश्वास होता ते भामटे असणे, हे शिवाजीच्या मंदबुद्धीचे लक्षण ठरेल. तसे मानण्यास महाराष्ट्र सहसा तयार होणार नाही. (पृ. १३५)

पूर्व ज्ञानाचे श्रेय 'गप्पा' लिहिणारास देणे कितपत योग्य होईल ?

"२० डिसेंबर १६७५ च्या सुरतेच्या
एका पत्राप्रमाणे पहाता बॅरॉनला
ऑगस्ट १६७५ त शिवाजीच्या कर्नाटक
स्वारीचा बेत कळला" (पृ. ४८६)

जानेवारी १६७७ च्या स्वारीचा बेत इतक्या आधी परकी व्यापाऱ्यांस समजू देण्याइतके ढिले व्यवहार आमच्या शिवप्रभूंचे होते असे कसे मानावे ? खुद्द शेजवलकरांनीच (पृ. १६० वर) म्हटले आहे की जिंजीकडे जाण्याचा शिवाजीचा हेतु स. १६७५ च्या अखेरीपर्यंत तरी नव्हता !! तरी ब्रिटिश रेकॉर्डातली बाजारबातमी खरी मानण्याकडे त्याचा कल आहे. या बाबतीत म्हणजे वखार-वाल्यांच्या पत्रांतील 'गप्पा' संबंधी पुरावा साधनग्रंथातच आहे म्हणून बरे. शिवाजी मृत्यु पावल्याची खबर (पृ. ४९७)

२४ जाने. १६७६
८ फेब्रु. १६७६
१२ फेब्रु. १६७६
७ एप्रिल १६७६
२५ मार्च १६७५ (?)
१३ मार्च १६७५–७६ (?)

–अशा सहा निरनिराळ्या ठिकाणहून पसरलेली म्हणून दिली आहे. ती खरी मानल्यास किंवा त्या त्या पत्रलेखकास "पुढील बेत" आधी समजला असे मानल्यास मोठीच पंचाईत पडेल !! गप्पांचे पीक त्यावेळी कसे पसरे हे अनेक उदाहरणावरून स्पष्ट दिसत असता, त्या वेळची दळणवळणाची मर्यादित साधने लक्षात घेता, अशा बातम्या, मग त्या "इंग्रज" वखारवाल्यांच्या "रेकॉर्ड"मधील (नंतरच्या) छापील असोत अगर नसोत. तपासून, तावून, सुलाखून, घेण्याची आवश्यकता सहज पटते. रेकॉर्डमधील



अनुक्रमणिका






### अंतिम हेतु

**मुसलमान** राज्यपद्धतीचा अंतिम हेतु अखेरीस सर्वांना मुसलमान करण्याचा होता. शिवाजीच्या राज्यपद्धतीने इस्लामी धर्म मुक्त जाऊन आपोआप निरुपद्रवी होणार होता.

" रिपोर्ट " आहे. तेव्हा त्यात तथ्य असलेच पाहिजे- अशा ( अंध ) विश्वासाने वखारवाल्यांचे ( ब्रिटिश, पोर्तु० – डच ) आधार ह्या साधनग्रंथात वापरले आहेत. चिकित्सा केल्याशिवाय कुठलाही पुरावा ग्राह्य मानणे रास्त नव्हे. म्हणून " रेकॉर्ड " मधील नोंदी कडक रीतीने तपासणे आवश्यक आहे.

शेजवलकरांच्या नावावर निदान नावाबरोबर काही अर्ध कच्चे, पुरा विचार न करता- जमविलेले साहित्य छापण्याचा उत्साह प्रशंसनीय म्हणता येणार नाही. कारण निवडा–निवडीतच अधिक वेळ जाईल आणि प्रत्येक अभ्यासूला ही निवड साधेलच असे नाही. कित्येकांनी सर्वच लिखाण शेज०चे समजून त्यावर झोड उठविली आहे.

शेजवलकर हे महाराष्ट्रास आजच परिचित झाले असे नव्हे. त्यांचे लिखाण म्हणजे ते सर्वगुणसंपन्न असलेच पाहिजे, त्यात एकही दोष दिसू नये, अशी अपेक्षा करणाराला जगाचा फारसा अनुभव नसावा. खुद्द शेज०ही आपल्या लिखाणातल्या आपल्या वैशिष्ट्यावर खूष असतील असे वाटत नाही. परंतु कालान्तराने, त्यांचे विक्षिप्तपण त्यांचे वैशिष्ट्य होऊन बसले–त्या विक्षिप्तपणा खेरीज त्यांच्या लिखाणात वाचकांना गोडी वाटेना. अशा एका लेखकाच्या " लहरी " वैशिष्ट्यामुळे त्याचे लिखाण वाचूच नये, असे म्हणणारा पुष्कळ प्रकारच्या वाचनानंदाला मुकेल. कारण प्रत्येक लेखकाचे काहीना काही तरी वैशिष्ट्य, विक्षिप्तपणा, अप्रासंगिकपणा त्याच्या शैलीत येतो. तो त्या शैलीचा अविभाज्य घटक बनतो. पण तेवढ्याने त्याच्या लिखाणाला कमीपणा येत नाही. शेज०चे आणखी वैशिष्ट्य असे की शिवचरित्र लिहिण्यासाठी त्यानी **पद्धतशीर** कार्य आरंभिले. विद्यापीठांकडून वा अन्य मार्गे साधने, अनुदाने, मिळविणारात ही अशी कार्याची पद्धतशीर आखणी सहसा आढळत नाही. आधुनिक कालात निरनिराळ्या राज्यात स्वातंत्र्य-प्राप्तीचा इतिहास लिहिण्याचे, जिल्हावार गॅझटिअर्स पुनरावृत्तीचे प्रयत्न काही थोडे झाले नाहीत. त्यासाठी पैशाचे पाठबळ अमर्याद होते तरी कुणी एकानेही अशा पद्धतशीर मार्गाने काम केल्याचे आम्हास ठाऊक नाही. उलट कसे तरी काम डफरावण्याकडे बहुतेकांची वृत्ति दिसते. पद्धतशीर काम करणारांनी चुका केल्या किंवा त्यांच्या हातून चुका घडल्या, म्हणून पद्धत दोषार्ह ठरत नाही. पण हा विचार सहजासहजी कुणाला सुचणार नाही. असो.

शेज० ची मते विक्षिप्त होती – ती स्पष्टपणे लिहिण्या-बोलण्याच्या ओघात सांगण्यास ते कचरत नसत. कुणाच्या रागा-लोभाची परवा त्याना नसे. " गांधींएवढा अनैतिहासिक मनाचा ऐतिहासिक पुरुष इतिहासात आजवर झाला नसावा, " असे त्यानी म्हटले आहे. " आपला समाजच इतका ढिला, अज्ञ, तर्कहीन, एवंच भ्रमिष्ट आहे की तो नसेल तेथे भ्रम निर्माण करील " अशीही स्वजननिंदा त्यांची आहे. "मराठ्यास हिंदुस्थान काबीज करण्याचा नैतिक हक्क एकाच गोष्टीने मिळण्यासारखा होता. ती गोष्ट म्हणजे हिंदूंचे हिंदुस्थान यवनाक्रांत झाले होते. ते मोकळे करण्याची धार्मिक इच्छा. " अशा बोचक स्पष्ट विचारांमुळे शेज०चे विक्षिप्त वाटणारे लिखाण वाचावेसे वाटत असे. रामदासांबद्दल– त्यांच्या दासबोधाबद्दल– उल्लेख मागे केलाच आहे. श्रीशिवछत्रपती आणि पेशवे यांची " तुलना ( =विरोध ) तर ते वारंवार करीत आणि छत्रपतींची श्रेष्ठता पटवून देत. " तस्मात् शेषं न शेषयेत् " हे शेवटचे चरण असलेला श्लोक उद्धृत करून शेज० म्हणतात- ही शिवाजीने ओळखलेली राजनीती पेशव्यांनी अवलंबिली नाही– कारण, ही नीति आचरण्यास लागणारा करडेपणा शिवकालीन मराठ्यांत होता– तो पेशवाईत उरला नव्हता. पण अशी स्पष्टोक्ति, धक्का देणारी मते विवेचनाच्या ओघात, छेदकाच्या शेवटी कुठे तरी येत– म्हणून तत्पूर्वीचे सर्व विवेचन त्याज्य कसे मानावे ?

शिवचरित्रात आता सांगण्यासारखे नवे उरले आहे काय ? असा प्रश्न काही विचारतात. शिवचरित्राची






गरजच नसती तर श्री. यशवंतराव चव्हाणासारखा व्यवहारी मंत्री महामहोपाध्याय द. वा. पोतदारांना ह्या कार्याची " सुपारी " देताच ना. आणि दत्तोपंतासारखा ती स्वीकारताच ना. " मराठा मंदिरा"ला देखील आपण हे कार्य पत्करावे असे वाटले तर तो काही त्यांचा दोष नव्हे. " शिवचरित्रा"ची विलक्षण मोहिनी महाराष्ट्राला आहे. श्री. दि. वि. काळे यांचे पुणे विद्यापीठाने प्रकाशिलेले " शिवचरित्र " ( मराठी २ आवृ. ) इंग्रजी करावे अशा आग्रहाच्या सूचना होत आहेत. निरनिराळ्या भाषात शिवचरित्रे किती आहेत, अजून किती होत आहेत, याचा अंदाज घेऊन पहाण्यासारखा आहे.

अशा परिस्थितीत शेजवलकर शिवचरित्राबद्दलच्या आमच्या अपेक्षा उंचावल्या, हा काही गुन्हा नव्हे. आपल्या मनातील इच्छा बोलून-लिहून दाखविणे हाही दोष नव्हे. मात्र अशा इच्छा-अपेक्षा बोलून दाखविल्यामुळे कित्येकांना दुःख झालेले दिसते, इलाज नाही. परीक्षण संपविताना पुनः मराठा मंदिरास धन्यवाद द्यावेसे वाटतात. कारण शेजवलकरांना त्या मंदिराने वागविले तशी वागणूक फार थोड्या लेखकांच्या वाट्यास येते. प्रकाशक, संपादक किंवा ग्राहक–वाचक अशा अनेकांशी लेखकाचा संबंध येतो. पण मराठामंदिराने या लेखकांना वागविले तसे इतर कुणीही वागविले नाही. महाराष्ट्रात तरी अशी आदर्श वागणूक महाराष्ट्रीय संस्थांकरवी फारच क्वचित् लेखकांच्या वाट्यास येते. शेजवलकरांना ह्या कार्यास नेमून त्यांचे हे अर्धमुर्धे साहित्य आहे तसे त्वरित प्रसिद्ध करून मराठामंदिराने अनेकांना स्वोदाहरणाने सदाचार शिकविला आहे. संपादनातल्या ढिलाईचे धनी निराळे दिसतात.

---













अनुक्रमणिका

## वाचकांचा पत्रव्यवहार --

स. नमस्कार वि. वि.

माझ्या 'श्रीगणेशरहस्यदर्शन' या सप्टेंबर १९६४ च्या 'नवभारतात' लिहिलेल्या लेखावर श्री म. म. डॉ. वा. वि. मिराशी आणि श्री प्र. रा. देशमुख यांनी काही आक्षेप घेऊन ते जानेवारी १९६५ च्या अंकात प्रसिद्ध केले आहेत त्याना शक्य तितक्या कमी शब्दात उत्तर देतो.

मी तळटीपेत दिलेल्या मजकुराचा लेखकाने विपर्यास केला आहे. त्यात माझ्या स्वप्नातही न आलेल्या गोष्टीचे आक्षेपकांनी विवेचन केले आहे. वास्तविक मला ज्यावेळी उज्जयिनी विद्यापीठाने आमंत्रण दिले त्यावेळी मीच पत्र पाठवून विचारले होते की, कोणत्या विषयावर लेख पाहिजे ? त्यावेळी त्याच्याकडून उत्तर आले की, कवीच्या काळावर व देशावर तुम्ही लिहावे अशी इच्छा आहे. श्री. कानिटकर यानी वरच्या लोकांचे मत घेऊन मला संस्कृत पत्र लिहिले की तुम्ही कवीचा काळ व देश यावर लेख लिहावा व तोही हिंदीत. हे विचारण्याचे कारण असे की एकाच गोष्टीवर लेखकांचा भर असू नये. त्या पत्रात आणखी असेही होते की, 'तत्रत्या भाषा.' म्हणजे हिंदीत लेख लिहावा. तेव्हा माझे हिंदीचे ज्ञान लेख लिहिण्याइतके नाही हे जाणून मी माझा लेख प्रथम मराठीत लिहिला आणि श्री. जोगळेकर नावाचे एक चांगले महाराष्ट्रीय हिंदी भाषेचे तज्ञ होते. त्यांचेकडून, व स्वतःच्या पैशाने त्याचा हिंदी तर्जुमा करून घेतला. उज्जयिनीला गेल्यावर पंडित सूर्यनारायण व्यास म्हणून एक वजनदार उत्सवप्रवर्तक होते त्यास भेटलो व विचारले की माझे नाव कोणी सुचविले ? त्यानी सांगितले की १९४३ साली 'विक्रम द्विसहस्राब्दि' होती त्या वेळच्या मराठी खंडातील माझा लेख त्यांना विशेष पसंत पडला. आणि वर त्यांनी असेही सांगितले की, त्या मराठी लेखाचे हिंदीमध्ये भाषांतर करून ते कोणत्यातरी हिंदी मासिकात त्यांनी प्रसिद्ध केले ही गोष्ट मला तेथपर्यंत अज्ञात होती मला युरोपियज्ञांचा द्वेष आहे असे प्रस्तुत आक्षेपक म्हणतात. परंतु मी स्वतः युरोपियन कॉलेजातच शिकलो व शिकवून सर्वांचा लोभ संपादला होता. काही उद्धट व अल्पज्ञ युरोपियन लोकांचे मतावर मी टीका केली आहे ही गोष्ट खरी. परंतु मी युरोपियनांचा आधार घेऊन आपले म्हणणे पुढे मांडले नाही.

वराहमिहिराच्या व अमरसिंहाच्या ग्रंथावरून गजवदन गणपतीची उपासना त्यांचेपूर्वी शेकडो वर्षे प्रचलित होती हे अमरकोषांतील गणपतीच्या नावात भर पडलेली नाही या एकाच गोष्टीवरून ते सिद्ध होते.

'का कथा बाणसंधाने' यातील दुष्यंताची गणपतीशी तुलना राघवभट्टास कशावरूनही सुचो, पण ती आक्षेपकाला प्रथम सुचली नव्हती हे सिद्ध होते. कारण तशी सुचली असती तर त्याने त्या वचनाची वासलात लावावयास हवी होती. आणि एक टीकाकार पूर्वीच्या दुसऱ्या टीकांची नक्कल करीत नाही. जर ग्रंथकार री ओढीत नाही असे आक्षेपकास वाटते तर टीकाकारही तसे करीत नाही हे सिद्ध होते. नाही तर वेगळी टीका लिहिण्याचे कारण नव्हते. जो जास्त विद्वान त्याची टीका सर्वमान्य होते.

'कथासरित्सागर' हा काही ऐतिहासिक ग्रंथ नव्हे परंतु त्यात काही ऐतिहासिक पुरुष आहेत व बाकी कथांचे नायक अनैतिहासिक आहेत. पण दुसऱ्यावरून पहिल्यांचे नास्तित्व सिद्ध होत नाही. किंवा सगळेच सारखे मानावे म्हणून कोणाला कोणावर जुलुम करता येत नाही.

मेघदूतातल्या दिङ्नागाला ऐतिहासिक पुरुष मानावे असा कोणाचाही आग्रह नाही. आणि कुंदमालेचा कर्ता भवभूतीचा पूर्वभावी मानावा लागतो. कारण उत्तररामचरितानंतर त्याला ते नाटक








लिहून आपला दर्जा कमी व्हावा असे वाटले नसते.

नागार्जुनाच्या गुरूचा गुरू गणेश हा देव असो की आचार्य असो तो गणेशाचे प्रचलितत्व दाखवतो.

ओंकार हा प्राचीनकाळी कसा काढीत असत ते कोणी सांगू शकत नाही. प्रांतोप्रांतीच्या लिप्या जरी भिन्न असल्या– उदाहरणार्थ गुजराती किंवा बंगाली तरी– ओंकाराचे स्वरूप कायम आहे; त्यावेळी कोरलेले लेख त्या त्या वेळी प्रचलित असलेल्या लिप्यातून कोरलेले आहेत. मोडी–मराठी लिपी हीच काही प्रथमपासून महाराष्ट्रात होती असे म्हणता येत नाही आणि ती महाराष्ट्रीय असली तरी वेदांची कधीच नव्हती. 'भांडारकरात' संशोधित केलेले 'महाभारत' हे अगदी व्यासांनी केलेले महाभारत असे मी तरी मानावयास तयार नाही.

म. म. डॉ. मिराशींचा प्रौढिवाद पाहिला म्हणजे मला फ्रेंच राज्यक्रांतीतील एक विचित्र वल्लीची आठवण येते. त्या मनुष्याचे नाव 'मरा' (Marat) असे होते. तो कनव्हेशन (convention) मध्ये बोलावयास उठला म्हणजे लोकांना मौज वाटत असे. भाषणाच्या शेवटी तो म्हणायचा, "If you are not enlightened enough to understand me (at which they all laughed) so much the worse for you"

आता 'गणेशरहस्यदर्शनाची दुसरी बाजू' श्री. प्र. रा. देशमुखांनी दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांच्या लेखात दुसरी काही बाजू असेल असे वाटले होते. परंतु तिचा अत्यंत अभाव आहे. त्या विषयाची दुसरी बाजू दाखवण्याच्या ऐवजी प्रस्तुत सर्वज्ञकल्प आक्षेपक महाशयांनी काही न करता माझ्यावर उखडून पडण्याचा प्रयत्न केला आहे. त्यात प्राचीन वैदिक देवांचे उपास्य दैवतात रूपान्तर झाले आहे की काय ते स्पष्ट दाखविले नाही. विष्णू आणि सूर्य हे दोन निरनिराळे देव नाहीत असे कोणीही, केव्हाही म्हटलेले नाही. माझ्या म्हणण्याचा – अर्थात - यास्काचे अनुकरण करून – अर्थ एवढाच होता व आहे की, विष्णू, सूर्य, विवस्वान, मित्र, सवितृ वगैरे देवता सूक्तात वेगळ्या दिसत असल्या आणि त्यांच्यावर वेगळ्या सूक्ते असली तरी ती सूर्य देवतेची भिन्न भिन्न नामरूपे आहेत. पुराणातही तसेच वर्णन आहे. द्वादश मासात द्वादश आदित्य वेगळे असतात. ह्या सर्व देवता Solar Deities असे सर्वांचेच म्हणणे आहे.

'आदित्या द्वादश प्रोक्ताः।' त्यापुढे एक झाल्या असे कोणीही केव्हाही म्हटले नाही. अग्नी हा विविध रूपानी ऋग्वेदात प्रकटतो. तसेच आदित्य ही आहेत. ज्याने निरुक्तकार यास्काचे मत दिले तो अर्थातच यास्काच्या मताचा आहे. यास्क किंवा भाष्यकार दुर्गाचार्य हे केवळ बुडत्याला काडीचा आधार इतकीच त्याची किंमत हे प्रस्तुत सर्वज्ञकल्प लेखकांच्या लिहिण्यावरून पहिल्यानेच मला कळले. हे लेखकमहाशय न्यायसूत्रात सांगितल्याप्रमाणे निवळ वितंडवादी म्हटले पाहिजेत.

'स्वपक्ष स्थापनाहीना परपक्षदूषणमात्रावसाना वितंडा।' अशी वितंडेची व्याख्या केलेली आहे. म्हणजे वितंडवाद करणाराला स्वतःचा असा पक्ष नसतो. केवळ दुसऱ्याला दूषण देणे एवढाच त्याचा हेतू असतो. 'शंकर अशी कोणतीही देवता वेदात नाही' हे म्हणणे तर सर्वथा चुकीचे आहे. कारण शतरुद्रियात म्हणजे रुद्रात 'नमो हन्त्रे च हनीयसे च ....' आणि लगेच 'नमः शंकराय च मयस्कराय च' असे आहे. आणि यजुर्वेद हाही वेदच आहे. अग्नि हा ऋग्वेदातच उभयरूप दिसतो. त्याचे एक रूप अत्यंत सौम्य व सुखरूप आहे. अशी पुष्कळ वर्णने आहेत. ऋग्वेदाच्या प्रथममंडलात आंगिरस हिरण्यस्तूप ऋषीचे अग्नीविषयी असे वचन आहे, 'त्वमग्ने प्रथमो अंगिरा ऋषिर्देवोदेवानामभवः शिवः सखा' त्याचप्रमाणे 'अग्ने नय सुपथाराये अस्मान' इत्यादी ऋचातही वर्णन आहे. आणि त्यांचे दुसरे स्वरूप उग्र व भीम आहे. ते 'अग्निरिव मन्यो त्विषितः सहस्व सेनानोर्नः सहुरे हूत एधि' अशासारख्या ऋचातून वर्णिले आहे. तेव्हा अग्नी हाच रुद्र व रुद्र म्हणजे उभयरूपी शिव किंवा मृड असे सिद्ध होते. तसेच अग्नि हा द्विशीर्षक देव आहे. 'द्वे शीर्षे सप्तहस्तासो अस्य।' असे त्याचे वर्णन आहे. तसेच शिवाचे रूपही अत्यंत सौम्य व अत्यंत उग्र असे



अनुक्रमणिका






आहे. 'शंकर' हे नाव त्याचे सौम्य स्वरूप दाखविते. उग्र आणि भीम ही त्याची नावे आहेत. आणि अग्नीला वृषभ म्हटले आहे. त्यामुळे शिव व अग्नि यांचे साम्य दिसते. आणि त्यामुळे अग्नीवरून शंकराची कल्पना केली गेली असे कोणी म्हटले तर त्यात कोणालाही झोंबण्याचे कारण नाही.

ओंकाराचे महत्त्व दाखविण्यासाठी माझी किती पाने खर्ची पडली असली तरी ती निर्मत्सर वाचकांना अनावश्यक वाटणार नाहीत. ओंकार हा कोणत्याही वेदाचा भाग म्हणून नाही परंतु तो सर्व छंदांचा अग्रणी आहे हे मी दाखविले आहे. आणि त्यामुळे त्याचे महत्त्व वेदकाळी फार होते हे उपनिषदातील 'ओम् इत्युद्‌गीथमुपासीत, ओम् इत्येकाक्षरं ब्रह्म' या उपनिषदातील वाक्यावरून सिद्ध होते. 'सर्वाणि छंदांसि, ओंकार वषटकारः आणि व्याहृतयः' या देवता जळतर्पणीय म्हणून झालेल्या ब्राह्मणादिकांच्या काळात दिसतात. पंचमहायज्ञाचे महत्त्व तैत्तिरीय ब्राह्मणात व इतरत्रही सांगितले आहे. त्यात ब्रह्मयज्ञ प्रथम आहे. आणि त्यामध्ये सर्वाणि छंदांसि तृप्यन्तु, 'ओंकारस्तुप्यतु. व्याहृतयस्तृप्यंतु' हे कोणत्या अनार्यापासून ब्राह्मणादिक शिकले याचा प्रस्तुत सर्वज्ञकल्पानी विचार केला असेलच. माझे स्पष्ट मत असे आहे की, ते ते कोणापासूनही शिकले नाहीत.

ओम् हा मंत्रभाग नसल्यामुळे त्याला अर्थ नाही. अर्थात त्याचा अर्थ कोणी दाखविण्याच्या फंदात पडले नाही. ते एक अत्यंत पवित्र व अत्यंत मंगलदायक असे एकच पद आहे. 'ओम् तत् सदिति निर्देशो ब्रह्मणः त्रिविधः स्मृतः' त्याचप्रमाणे 'गिरामस्म्येकमक्षर', 'प्रणवः छंदसामिव' इत्यादि वचने त्याचे अतिप्राचीनत्व दाखवितात.

हा ओंकार ब्राह्मणाचे पूर्वज केव्हा, कोणापासून व कोठे शिकले ते प्रस्तुत आक्षेपकांनी संशोधन करून प्रसिद्ध करावे अशी आमची आग्रहाची विनंती आहे. ओंकार हा वेदभाग नसल्यामुळे उपनयन होण्याचे पूर्वी ब्राह्मणमुलाने म्हणण्यास केव्हाही प्रत्यवाय नाही. आणि ज्ञानेश्वरांनी त्याचा उपयोग केला आहे. सिंधुनदीच्या खोऱ्यात काय होते याचा मी विचार केला नाही व करणार नाही. आक्षेपकांनी फार खोल जाऊन तसा केला असल्यास आपले संशोधन ऊर्फ त्रैकालिक सिद्धांत प्रसिद्ध करावा. 'नैरुक्तक' अथर्वणशीर्ष वगैरे शब्द त्याना कोठे आढळले ते मला कळत नाही. सर्वत्र आढळणारे नैरुक्त व अथर्वशीर्ष असे शब्द मला माहीत आहेत. आणि पवित्र ओंकारावरूनच पवित्र गणेश निघाला असे माझे मत आहे. 'गम्' हे गणपतीच्या मंत्राचे बीज आहे. ओंकार हा सर्व वेदांना समान आहे. तो बीज नव्हे. 'ओंप्रणय' वगैरे अनुमती जेव्हा देण्यात येते तेव्हा अर्थातच बीजाची कल्पना नसते. आणि ओंकार तर सर्व वैदिक क्रियाकलापांत ओतप्रोत दिसून येतो. आणि त्यामुळे तो विद्यादेव, बुद्धिदाता व मंगलमूर्ति असा सर्वत्र दृष्टिगोचर होतो. आणि त्याचे मांगलिकत्व पितृकार्यासारख्या अमांगलिक अशा कृत्यापासून अलिप्त कसे राखले जाई ते मी माझ्या पहिल्या लेखात दाखविलेच आहे. अमुक गोष्ट अशी असावी; फलाणी गोष्ट तशी असावी इत्यादी आक्षेपक महाशयांचे त्रिकाळाबाधित सिद्धांत त्यांचे कोणी समानधर्मी असतील त्यांना महत्त्वाचे वाटले तर कोणाची काही हरकत नाही. कार्यकारणे ही परस्परांची समान असतात असे दाखविण्याचा माझा हेतू होता. तसेच ओंकार व गणेश हे एकमेकाशी अत्यंत समान आहेत असे मी माझ्या पूर्वीच्या लेखात दाखविले आहे. सिंधु नदीच्या खोऱ्यातील आर्यपूर्वांपासून किंवा अनार्यांपासून वैदिक ब्राह्मणांनी काय काय आणले ते प्रस्तुत सर्वज्ञकल्प आक्षेपक जाणोत. कदाचित सर्व वैदिक वाङ्मय तेथूनच त्यांच्यापासून आणले असेल असे त्यांचे मत दिसते.

याविषयावर मी लिहिले एवढे पुरे आहे. आणखी काही लिहिणार नाही. प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे जरा विलंब लागला हे नवभारताचे निर्मत्सर वाचकास कळवितो आणि प्रस्तुत विषयावर काही उत्तर मिळणार नाही असेही त्यांना सुचवितो.

**– कृ. मो. शेंबवणेकर**

---



अनुक्रमणिका








## दक्षिण व्हिएटनामचा अदृश्य शत्रू :

दक्षिण व्हिएटनामपुढील एक मोठी आपत्ती म्हणजे दिवाळखोरीचे भय ही होय. अमेरिकन सहाय्य व सैन्य यांच्या वाढीबरोबरच तेथील अमर्याद चलन-वाढीचा संभवही वाढत आहे ; आणि यातून निर्माण होणारा धोका लष्करी पराभवाइतकाच भयावह आहे. जुलैच्या आरंभी हा धोका कितीतरी वाढल्या-मुळे युजिन ब्लॅक या अमेरिकेच्या अध्यक्षाच्या खास दूतांना सायगावला यावे लागले. आर्थिक बाजू सावरणे हा या भेटीचा खास उद्देश होता.

यापूर्वी द. व्हिएटनामपुढे चलनवाढीचा प्रश्न फारसा नव्हताच. तथापि गेल्या फेब्रुवारी महिन्यात वत्तीस हजार अमेरिकन सैनिक आल्याने तो एकदम निर्माण झाला. उन्हाळा संपण्यापूर्वी यात आणखी चाळीस हजार सैनिकांची भर पडणार आहे. ही मंडळी मोकळेपणाने भरपूर खर्च करणारी. तथापि या खर्चातील वाढीच्या प्रमाणात बाजारातील मालाचा पुरवठा मात्र वाढलेला नाही. उलट, लष्करी कामे वाढल्यामुळे, नागरिकांच्या गरजेच्या वस्तूंच्या उत्पादनाऐवजी, कामगार व साहित्य यांचा वाढत्या प्रमाणात त्यासाठी उपयोग होऊ लागला. अशा प्रकारे मागणी व पुरवठा यातील अंतर वाढतच गेले आहे. यामुळे साहजिकच नफेबाजी, काळाबाजार, इ. चा सुकाळ झाला आहे. हुंडणावळीच्या भावातही हा प्रत्यय येतो. बँका एका डॉलरला ७४ पिअॅस्टर्स देतात. काळ्या बाजारात हा भाव काही दिवसांमागे १२५ होता व आता तो १७० आहे.

पंतप्रधान चाओ की यांनी नफेबाजांना फाशी देण्याची घोषणा केली आहे. तथापि ही धमकी अजून प्रत्यक्षात यावयाची आहे. सायगावमधील वाढत्या लाचलुचपतीला बंदुकीच्या गोळ्यांनी आळा बसेल की नाही हा एक प्रश्नच आहे. अमेरिकेच्या दरवर्षीच्या दहा कोटी डॉलरच्या मदतीचा बराच भाग सरकारी व लष्करी अधिकाऱ्यांच्या खिशात जातो. अमेरिकन रेफ्रिजरेटर व एअरकंडिशनर रुग्णालयांसाठी येतात व सेनानींच्या घरात जातात. लढाईत कामास आलेल्या सैनिकांची माहिती सायगावला न दिल्यामुळे त्यांचा पगार लष्करी अधिकारी वसूल करतात. कोणाही सुखवस्तु तरुणाला ६७५ डॉलरला गृहखात्याचा "डिप्लोमा" मिळू शकतो. याचा अर्थ तो सरकारी 'हेर' बनतो; व त्यामुळे लष्करात दाखल होण्याच्या सक्तीतून सुटतो. आता आणखी एक नवी युक्ती निघाली आहे. प्रादेशिक अधिकाऱ्यांनी पूल उडवायचे ; व्हिएटकाँगचे घातपाती कृत्य म्हणून अहवाल द्यायचा, आणि पुनः बांधण्यासाठी लष्कराकडून भले मोठे कंत्राट मिळवायचे.

उलट, अन्नधान्याच्या किंमती भरमसाट वाढल्याने सामान्य नागरिकाचे दारिद्र्य वाढले आहे. तांदुळाच्या किंमतीत गेल्या जानेवारीपासून ३३ टक्के वाढ झाली आहे. आणि ह्या मालाचा साठा करणारे सायगाव-मधील चिनी व्यापारी यातील बराच नफा मिळवीत आहेत. यामुळे तांदुळाची निर्यात करण्याऐवजी यावर्षी दक्षिण व्हिएटनामला पन्नास हजार टन तांदूळ अमेरिकेतून मागवावा लागला आहे.

— टाइम, ९ जुलै १९६५.

## व्हिएटनाम आणि नागरीक हक्क आंदोलन:

भारतीय राजकीय पक्षोपपक्ष व अन्य संघटना केवळ अंतर्गत प्रश्नांबद्दलच नव्हे तर आंतरराष्ट्रीय प्रश्न व परराष्ट्रीय धोरण याबद्दलही मतप्रदर्शन करीत असतात. काही प्रमाणात ही परिस्थिती सर्वत्रच आढळते; पण काही बाबतीत मात्र वाद निर्माण होतो. अमेरिकेतील नीग्रोंना नागरीक हक्क मिळवून देणारे आंदोलन व ते चालवणाऱ्या संघटना यांच्या व्हिएटनामबाबतच्या भूमिकेविषयी असाच वाद निर्माण झाला आहे. या वादातील काही महत्त्वाच्या भूमिका टाइम साप्ताहिकाने दि. १६ जुलैच्या अंकात दिल्या आहेत. त्यांचा हा सारांश :

नीग्रोंच्या नागरीक हक्कविषयक संघटनांनी आपले लक्ष केवळ आपल्या कार्यापुरते मर्यादित ठेवावे की ते इतर, अमेरिकेच्या परराष्ट्रधोरणासारख्या, अधिक








व्यापक प्रश्नाकडेही पुरवावे, या प्रश्नाबाबत मतभेद वाढत आहेत.

रेव्ह. मार्टिन लुथर किंग यांचे असे ठाम मत आहे की, नागरीक हक्क आंदोलनाने-युद्धासारख्या प्रश्नावर मत द्यावयास घाबरण्याचे मुळीच कारण नाही. ऐक्या (इंटिग्रेशन) विषयी बोलणे फारच छान आहे. पण ऐक्यासाठी अनुकूल जगही असणे आवश्यक आहे. फराळाच्या दुकानात सर्वांनी एकत्र बसून दुग्धपान करावे ही चांगली कल्पना आहे ; पण त्या दुधात "स्ट्रोशियम ९०" असल्यास हा आनंद काय कामाचा? जगात युद्धाची परिस्थिती वाढत असताना एकही शब्द न बोलता मी बाजूला स्वस्थ बसू शकणार नाही. व्हिएटनाममधील युद्ध बंद झाले पाहिजे, वाटाघाटींनी तेथील प्रश्न सुटला पाहिजे हे मला माहीत आहे.

कोर संघटनेचा प्रमुख जेम्स फार्मर यानेही निश्चित अभिप्राय व्यक्त केला आहे. तो म्हणतो : दारिद्र्य व दुराग्रह यांच्याशी सरकारला निश्चित सामना द्यायचा झाल्यास व्हिएटनामी जनतेविरुद्ध लढण्यात कोटयवधि डॉलरचा चुराडा करून भागणार नाही. देशातील गरजा लक्षात घेतल्यास आज होणारा खर्च अगदीच तुटपुंजा आहे. आणि युद्धावर होणाऱ्या खर्चाच्या मानाने कितीतरी अपुरा आहे.

फार्मरच्या या विधानांमुळे कोरच्या डरहॅम येथील २१ व्या राष्ट्रीय संमेलनात व्हिएटनाम व डोमिनिकन प्रजासत्ताकमधून अमेरिकन सैन्य परत घेण्याचा ठराव पास झाला. तथापि तो पास होताच फार्मरने फेर विचाराची भाषा सुरु केली. "मला ठराव पूर्णपणे मान्य आहे. परंतु तो व्यक्तिशः. आपण सर्वांनी या प्रश्नावर व्यक्तिगत भूमिका घेणेच इष्ट. संघटना म्हणून कोणताही अभिप्राय देऊ नये; नाहीतर आपले ऐक्य दुभंगण्याची , पाठिंबा कमी होण्याची भीती आहे."

अमेरिकन "कलरड्" जनतेच्या राष्ट्रीय संघटनेचे चिटणीस रॉय विल्किन्स यांने याबाबत काहीशी वेगळी भूमिका घेतली आहे. तो म्हणतो, "अलाबामा-मधेच लक्ष देण्याजोगे भरपूर 'व्हिएटनाम' आहे असे आम्हास वाटते. अलाबामा वा मिसिसिपीमधील प्रश्नांशी व्हिएटनाम जोडणे, आणि मतदान हक्क, नोकरी इत्यादी नीग्रोंच्या अन्य मागण्यांशी त्याचा सांधा जुळवू पहाणे म्हणजे आपल्या पुढील प्रश्नांची अकारण गल्लत करणे होय. नागरीक हक्कासाठी झगडणाऱ्या गटांना व्हिएटनामविषयी पुरेशी माहिती आहे असे मला वाटत नाही; परराष्ट्र धोरणही त्यांना अवगत असेलसे नाही; आणि म्हणूनच त्यात आपली विशिष्ट भूमिका आहे असा त्यांनी आग्रह धरण्याचे कारण नाही. नाहीतर या देशात वीस कोटी परराष्ट्र-मंत्री व्हायचे आणि सारे कार्यच बंद पडण्याचा अनावस्था प्रसंग यायचा."

—टाइम, १६ जुलै १९६५.

## वीस लाख अमेरिकन्स :

व्हिएटनाममधील परिस्थिती, सुधारण्याचे आधी, पुष्कळच बिघडणार आहे. व्हिएटकाँगने सायगावची नाकेबंदी करण्यास सुरवात केल्याची लक्षणे दिसत आहेत. आपली गनिमीकाव्याची लढाई त्यांनी राजधानीपर्यंत पोचवली आहे. मोकळ्या लढाईत पण ट्युमोरॉंग हे जिल्ह्याचे ठिकाण त्यांनी काबीज केले आहे. पावसाळ्याचा फायदा घेऊन व्हिएटकाँग जास्त जास्त प्रदेश काबीज करण्याचा प्रयत्न करीत आहेत. व प्रत्येक वेळी जंगली प्रदेशात आपल्या सैनिकांचे जीव धोक्यात घालण्यास अमेरिकन सेनापती तयार नाहीत व ते योग्यही आहे.

राष्ट्रकुलराष्ट्रांच्या प्रतिनिधीमंडळास भेटण्यास हनोइ किंवा पेकिंग उत्सुक नाहीत. कारण व्हिएटकाँग सैनिकांना पावसाळ्याचा मिळणारा फायदा जास्तीत जास्त उठवण्याचा त्यांचा इरादा दिसतो. परंतु दोन्ही राजधान्यातून हवामानाच्या पलिकडे विचार करणारे मुत्सद्दी असलेच पाहिजेत. उत्तर व्हिएटनामला संबंध व्हिएटनाम कम्युनिस्ट राजवटीखाली एकत्र करावयाचा आहे. परंतु आज अमेरिका दक्षिण व्हिएट-नाममध्ये प्रचंड विमानतळ, बंदरे व रस्ते बांधीत आहे. व त्यावरून सध्यापेक्षा कितीतरी मोठे सैन्य तेथे उतरविण्याचा अमेरिकेचा मनोदय स्पष्ट होत आहे. अशा परिस्थितीत व्हिएटकाँगला टिकाव धरावयाचा असेल तर उत्तर व्हिएटनामी सैन्याची मदत तर त्यांना घ्यावी लागेलच परंतु वेळप्रसंगी चीनी सैन्याची मदतही मागावी लागेल. हानोईतील काही










मुत्सद्यांना तरी ही गोष्ट नको आहे. परंतु उत्तर व्हिएटनाममधील कम्युनिस्टांचे सध्या तीन गट झाले असून कोणताही गट आपण पराभूत मनोवृत्तीचे आहोत असे दाखवण्यास तयार नाही.

चिनी परराष्ट्रमंत्री मार्शल चेन यी यांना व्हिएटनाममध्ये येणाऱ्या वीस लक्ष अमेरिकन सेनेचे काही वाटत नसले तरी पेकिंगमध्ये सर्वांनाच त्यावद्दल बरे वाटत आहे असे मात्र नाही. चीनचे ध्येय फार मोठे आहे. या युद्धात अमेरिकेला नेस्तनाबूद करून आशिया-खंडातून अमेरिकेला हाकलून लावणे हा त्यांचा मुख्य उद्देश आहे. परंतु व्हिएटनाममध्ये उतरणारा प्रत्येक उत्तर अमेरिकन सैनिक हा उद्देश सफल होण्यात अडचण निर्माण करीत आहे. फार मोठ्या प्रमाणावर युद्ध झाल्याखेरीज निदान कोरियन युद्धाएवढे युद्ध झाल्याखेरीज हे जमणे अशक्यच आहे आणि कोरियन युद्ध तरी चीनने कोठे जिंकले ? सध्या उत्तर व्हिएटनामी सैन्याचे मागे राहून अमेरिकेशी अप्रत्यक्ष सामना देणे चीनला शक्य आहे. परंतु ते फार काळ चालेल असे वाटत नाही. अध्यक्ष जॉन्सन यांची आशियात राहण्याची इच्छा किती प्रबळ आहे याची त्यांना कल्पना येऊ लागली असली पाहिजे. चीनी कम्युनिस्ट फाजील धाडशी नाहीत हे निश्चित !

रशियाचे धोरण हानोई किंवा पेकिंग पेक्षा जास्त लवचिक आहे असा समज होणे साहजिक आहे. परंतु रशियाला सुद्धा दोन गोष्टी एकदम साधावयाच्या आहेत. एका बाजूस त्यांना सहजीवन पाहिजे आहे तर दुसऱ्या बाजूस 'स्वातंत्र्य संग्रामाचाही' पुरस्कार त्यांना करावयाचा आहे. कोठलीही एक बाजू त्यांना उघड उघड घ्यावयाची नाही. परंतु ही परिस्थिती फार काळ टिकणार नाही. रशिया कोणती बाजू निवडणार, हे त्याची सहजीवनतत्त्वावर किती निष्ठा आहे यावर अवलंबून राहील.

पावसाळा संपेपर्यंत अमेरिका आपले पाय पक्के रोवून बसेल असे स्पष्ट दिसत आहे. म्हणूनच काही महत्त्वाची ठाणी जिंकण्याचा कम्युनिस्टांचा प्रयत्न चालू आहे. उत्तर व्हिएटनामच्या ३२५ व्या तुकडीने दक्षिणेत काही दिवसापूर्वी प्रवेश केल्याचे समजले आहे. उत्तरेत सर्वत्र सैन्यभरती पण जोरात चालू आहे. अमेरिकेची पूर्ण तयारी होण्याच्या आत एखादी तरी मोठी लढाई जिंकावी असा त्यांचा इरादा दिसतो. परंतु यामुळे अमेरिका फार मोठ्या तऱ्हेच्या सर्वंकष हवाई हल्ल्यास सुरवात करील अशीही भीती आहेच.

यातून मार्ग काढण्याचा एक रस्ता म्हणजे हानोईत बदल घडवून आणणे. रशियन मुत्सद्दी पडद्याआड खटपट करीत आहेत असे वाटते. श्री. कोसीजीन यांचे म्हणण्याप्रमाणे सर्व काही हानोईवर अवलंबून आहे. पुढच्या दोन महिन्यात अमेरिकेच्या लष्करी हालचाली वाढतील. सध्या व्हिएटकाँगना सायगावच्या परिसरातून बाहेर काढण्याचा त्यांचा उद्देश दिसत आहे. परंतु महत्त्वाच्या हालचाली दक्षिणेत जोरदार लष्करी संघटना निर्माण करण्याच्या उद्देशानेच होत आहेत व त्यामुळेच कदाचित हानोईचा हृदयपालट होण्याची शक्यता आहे.

—दि इकॉनॉमिस्ट, लंडन, ३ जुलै १९६५

## अल्जेर्सनंतर :

मंगळवार ता. २९ जून हा दिवस पेकिंगच्या इतिहासात महत्त्वाचा दिवस ठरणार होता. त्यादिवशी दुसऱ्या बांडुंग परिषदेच्या निमित्ताने चाउ-एन- लाय हे साम्राज्यवादी अमेरिका व कम्युनिझम-द्रोही रशिया या दोहोंच्यावर आफ्रिकी व आशिआयी नेत्यांसमोर उघड उघड हल्ले चढवणार होते. मॉस्कोला ही परिषद म्हणजे आपली परीक्षा वाटत होती कारण त्यांच्या उपस्थितीस चीनचा विरोध होता. तर एखादे मवाळ राष्ट्र आपली बाजू घेऊन भांडेल अशी अमेरिकेस आशा वाटत होती. अल्जेर्सला आफ्रिकी समाजवादाची तेज:पुंज ज्योत झळकणार होती. परंतु बेन बेला यांच्या पदच्युतीमुळे सर्वांचेच बेत फसले. अल्जेर्स परिषद ५ नोव्हेंबरपर्यंत स्थगित करण्यात आली. त्यामुळे परिस्थितीचे पुनर्लोचन करण्याची सर्वांनाच संधि मिळाली.

### तिसरे जग :

अल्जेर्स परिषदेच्या बोजवाऱ्याने तिसऱ्या जगातील आफरो-आशिआयी ऐक्यातील वाफ निघून गेल्याचे उघड झाले. हजर असलेल्या प्रतिनिधीतील भांडणे उघड होऊ लागली, तर काळ्या आफ्रिकेचे जवळजवळ सर्वच प्रतिनिधी शेवटी शेवटी गैरहजर होते असे दिसून आले.

बेन बेला हे अध्यक्ष नासर यांचे दोस्त. त्यांच्या पदच्युतीमुळे कायरो व अल्जेर्स यांचे संबंध साहजिकच दुरावले. अल्जेर्स परिषद भरणार असलेल्या रिकाम्या हॉलमध्ये झालेल्या बाँब–स्फोटाशी बोमदीन यांचे अनुयायांनी इजिप्तचा संबंध जोडला तर इजिप्त-मधील वर्तमानपत्रांनी बोमदीन यांनाच दोष दिला. एकंदरीत अगोदरच विस्कळित झालेले अरब जग जास्तच विस्कळित झाले.

आंतरराष्ट्रीय पातळीवर कम्युनिस्ट चीनला चांगलाच धक्का बसला. 'आफ्रिकेतील परिस्थिती क्रांति होण्यास योग्य आहे' या चीनी घोषणेमुळे बरीचशी आफ्रिकी राष्ट्रे चीनबद्दल साशंक झाली होती. त्यातच अनेक राष्ट्रांना परिषदेच्या मुद्यावर पण त्यांनी दुखावले. सिलोन, इथोपिया किंवा मोरक्को या राष्ट्रांना 'साम्राज्यवादी कटात सामील झालात' हे चीनचे म्हणणे अपमानास्पद वाटले याचा परिणाम म्हणून कम्युनिस्ट नसलेल्या राष्ट्रांचा एक गट आफ्रिकेत निर्माण झाला. व पेकिंगला आपली आशिया व आफ्रिका खंडातील पकड सैल होत आहे की काय असे वाटू लागले.

अल्जेर्सची परिषद स्थगित होण्याचा रशियावर झालेला परिणामपण गुंतागुंतीचा आहे. एका बाजूस रशियाविरोधी कारवाया होण्याची शक्यता असलेली परिषद पुढे ढकलली गेली म्हणून सुटकेचा निश्वास तर दुसरे बाजूस आपला हस्तक बेन बेला याच्या पदच्युतीचा खेद ! बोमदीन यांनी आपल्याला रशियाची मैत्री पाहिजे असली तरी आपण रशियन प्रचारयंत्र होण्यास तयार होणार नाही हे स्पष्ट केले आहे.

कम्युनिस्ट जगाशी अल्जेरियाचा संघर्ष वाढण्यात फ्रान्सचा फायदा आहे. फ्रेंच मदतीवर अल्जेरियाचे अर्थशास्त्र उभे आहे तर अमेरिकेच्या धान्यामुळे तेथील प्रजेला खायला मिळत आहे. बोमदीन यांचा कल आंतरराष्ट्रीय पत सांभाळण्यापेक्षा आर्थिक परिस्थिती सांभाळण्याकडे सध्या तरी जास्त आहे असे वाटते. व त्यामुळे पाश्चिमात्त्य जगाचे व अल्जेरियाचे संबंध सुधारतील असे वाटत आहे.

— न्युयॉर्क टाइम्स, ४ जुलै १९६५.



अनुक्रमणिका






# शेतीचे उत्पादन वाढलेच पाहिजे



शेतकऱ्यांचे जीवनमान सुधारण्यासाठी

शेतीचे उत्पादन वाढणे ही आपल्या देशाची प्रमुख गरज आहे आणि त्यासाठी महाराष्ट्र सरकार शक्य ते सर्व प्रयत्न करून शेतकऱ्यांना सहाय्य देत आहे.





तिसऱ्या योजनेच्या अखेरीस अन्नधान्याचे उत्पादन ७८.६ लाख टन होईल अशी अपेक्षा आहे, तर राज्याची अंदाजित गरज ९२.९ लाख टन आहे. अशा प्रकारें तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या अखेर राज्यात १४.३ लक्ष टन अन्नधान्याची तूट पडेल. म्हणून शेतकऱ्यांनी नजीकच्या भविष्यकाळात अन्नधान्याच्या बाबतीत राज्य स्वयंपूर्ण करण्याकरिता अधिकाधिक प्रयत्न केले पाहिजेत.

राज्य अन्नधान्याच्या दृष्टीने स्वयंपूर्ण होण्यासाठी



ऊस, कापूस व तेलबिया या नगदी पिकांच्या उत्पादनाच्या कार्यक्रमात वाढ करण्यात आली आहे. त्याचप्रमाणे शेतकऱ्याच्या वाढत्या गरजा भागविण्यासाठी सुधारलेले बीबियाणे, खते यांचे वाटप करणाऱ्या आणि शेतीसाठीं कर्ज देणाऱ्या विकास संघटनांची भक्कम पायादर उभारणी करण्यात आली आहे.

अत्यावश्यक अशा कच्च्या मालाचा उद्योगधंद्यांना पुरवठा करण्यासाठी

प्रकाशन संचालक, महाराष्ट्र शासन




